अखिलभारतीय–प्राच्यविद्यासम्मेलनम्
शतवर्षमहोत्सवग्रन्थमाला –८७

# वाल्मीकी रामायणाचे महत्त्व व व्यवस्थापनाची सूत्रे

(साहित्यिक, ऐतिहासिक, राजनैतिक, सांस्कृतिक, धार्मिक महत्त्व)

डॉ. मृदुला उल्हास नासेरी

प्रधानसंपादकः
आचार्यः श्रीनिवासः वरखेडी
कुलगुरु

संपादकः
आचार्यः मधुसूदनः पेन्ना
संचालकः संशोधन–प्रकाशनविभागः



राष्ट्रहिताय संस्कृतम्

कविकुलगुरु–कालिदास–संस्कृत–विश्वविद्यालयः
रामटेकम्, जि. नागपुरम् (महाराष्ट्रम्)

2020

अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ८७

# वाल्मीकी रामायणाचे महत्त्व व व्यवस्थापनाची सूत्रे

**(साहित्यिक, ऐतिहासिक, राजनैतिक, सांस्कृतिक, धार्मिक महत्त्व)**

**डॉ. मृदुला उल्हास नासेरी**

प्रधानसंपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)
२०२०

| | | |
|---|---|---|
| शीर्षक | – | **वाल्मीकी रामायणाचे महत्त्व व व्यवस्थापनाची सूत्रे** |
| लेखक | – | **डॉ. मृदुला उल्हास नासेरी** |
| प्रधानसंपादक | – | आचार्य श्रीनिवास वरखेडी<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| संपादक | – | आचार्य मधुसूदन पेन्ना<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग, क.का.सं.वि., रामटेक |
| अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन | – | प्रो. गौतम पटेल, अध्यक्ष<br>प्रो. सरोजा भाटे, सचिव<br>प्रो. ग. उ. थिटे, उपाध्यक्ष |
| संपादक मंडळ | – | डॉ. दिनकर मराठे, क.का.सं.वि., रामटेक<br>डॉ. वीणा गानु, नागपुर. |
| प्रकाशन वर्ष | – | २०२० |
| आवृत्ती | – | प्रथम |
| मूल्य | – | रू. १४३/– |
| आय.एस.बी.एन. | – | ९७८–९३–८५७१०–४४–५ |
| मुखपृष्ठ | – | श्री. उमेश पाटील |
| मुद्रक | – | दुर्गा प्रिन्टींग, नागपूर |
| प्रकाशक | – | कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक<br>प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक. |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

सरस्वती श्रुतिमहती महीयताम्

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek

Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek
Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# प्रकरण 1 ले

# वाल्मीकी रामायणाचे साहित्यिक महत्व

इ.स.पू. 500 मध्ये महर्षी वाल्मीकींनी रचलेले रामायण हे आर्ष महाकाव्य भारतीय संस्कृतीचा मूलाधार समजले जाते. लौकिक साहित्यात महर्षी वाल्मीकी हे आदिकवि मानले जातात. तर त्यांनी रचलेले रामायण महाकाव्य हे 'आदिकाव्य' मानले जाते. मर्यादा पुरूषोत्तम प्रभू श्रीरामचंद्राच्या संपूर्ण जीवनप्रवासाचे ऐतिहासिक व अत्यन्त काव्यमय वर्णन रामायणात केले आहे. म्हणून या आर्षमहाकाव्याला 'रामायण' असे नाव आहे.

**'रामस्य अयनम् इति रामायणम्'।**

वाल्मीकी रामायणात एकूण 24,000 लोक असल्यामुळे 'चतुर्विंषतिसाहस्त्रीसंहिता' असे रामायणाचे दुसरे नाव आहे. ही रामकथा सात काण्डांमध्ये विभागली आहे. 1) बालकाण्ड 2) अयोध्याकाण्ड 3) अरण्यकाण्ड 4) किष्किन्धाकाण्ड 5) सुन्दर काण्ड 6) युध्दकाण्ड 7) उत्तरकाण्ड

श्रीरामाने रावणाचा वध केला म्हणून रामायणाला 'पौलत्स्यवध ा' किंवा 'रावणवध' असेही म्हणतात. रामकथा पुढीलप्रमाणे विभागली आहे.

**1) बालकाण्ड – यात एकूण 77 सर्ग आहेत. यात राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांचे जन्म, बालपण, किशोरावस्था यांचे वर्णन आहे. याशिवाय राम लक्ष्मणांचे विश्वामित्र ऋषींसह वनगमन, राक्षसांचा वध, रामसीता स्वयंवर, रामाचे शिवधनुष्य भंग, रामसीता विवाह व लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांचे विवाह हा कथाभाग येतो. याशिवाय सत्ययुग, द्वापारयुग, त्रेतायुग आणि कलियुग यांचे वर्णन आणि अनेक उपकथांचा समावेश आहे.**

**2) अयोध्याकाण्ड – यात 119 सर्ग आहेत. यात रामराज्यभिषेक कैकेयीकडून रामाला 14 वर्षे वनवास, रामसीता लक्ष्मण यांचे वनवासगमन, दशरथ राजाचा मृत्यु, भरताचे**

**रामाला आणण्यासाठी चित्रकूट पर्वतावर गमन – भरताचे अयोध्येत आगमन व नंदीग्राम येथे वास्तव्य हा कथाभाग येतो.**

**3) अरण्यकाण्ड – यात 75 सर्ग आहेत. रामसीता लक्ष्मण यांचे दण्डकारण्यात वास्तव्य, राक्षसांशी संघर्ष – वर दूषण राक्षसांचा वध – रावणाद्वारे सीतेचे अपहरण – रामाचा शोक – सीतेचा शोध.**

**4) किष्किन्धाकाण्ड – यात 67 सर्ग आहेत. राम–सुग्रीव भेट – मैत्री – वालिवध – हनुमानाशी भेट – वानरसेना सीतेच्या शोधार्थ सिध्द हनुमानाचे लंकेला प्रयाण.**

**5) सुन्दरकाण्ड – 68 सर्ग, हनुमान लंकेला पोचतो. वानरसैन्याचे सेतुबन्धन, हनुमान–सीताभेट, हनुमानाचे लंकादहन, सीतेचा सन्देश घेऊन किष्किन्धानगरीत हनुमानाचे पुरागमन हनुमानाचे रामाला वृत्तान्त कथन.**

**6) युध्दकाण्ड – 128 सर्ग आहे. रामाद्वारे रावणाचा वध, रावणकुलाचा संहार – बिभिषणाचा राज्यभिषेक, सीतेची अग्निपरीक्षा – पुष्पक विमानाद्वारे अयोध्येत रामसीता लक्ष्मणाचे पुनरागमन.**

**7) उत्तरकाण्ड – यात 111 सर्ग आहेत, अगस्त्यऋषी रामाला रावणाचा वंश, जन्म, पराक्रम – वरदान यासंबंधी कथन करतात. सीतेचा लोकापवाद – रामाद्वारे सीतात्याग, सीतेचे वाल्मीकी ऋषींकडे वास्तव्य – लव कुश यांचे जन्म – रामाद्वारे अश्वमेध यज्ञ – लवकुशांचे गीत रामायण – रामसीता यांची पुनर्भेट – सीता युध्द चारित्र्याची साक्ष देऊन धरणीत अन्तर्धान पावते. लक्ष्मणाचा वध – रामाचे जलसमाधी घेणे – रामायण महिमा.**

रामकथा ही सर्वपरिचित असून अत्यंत लोकप्रिय आहे.

**रामकथा सारांश :** बालवयातील रामलक्ष्मणांना विश्वामित्र ऋषी यज्ञरक्षणासाठी अरण्यात घेऊन जातात. तेथे असतांना रामाने  त्राटिकाराक्षसीचा वध केला आणि यज्ञाचे संरक्षण केले. त्याप्रमाणे

आपल्या पराक्रमाने खर, दूषण, विराध इत्यादि अनेक राक्षसांचे वंश नष्ट केले.

नंतर जनक राजाने आपली कन्या सीता हिच्या विवाहासाठी स्वयंवर आयोजित केले. त्यासाठी शिवधनुष्य भंग करणाऱ्या युवकाला मी आपली कन्या देईन अशी घोषणा केली. तेव्हा रामाने शिवधनुष्याचा भंग केला म्हणुन सीतेशी रामाचा विवाह झाला. तसेच लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांचे विवाह सीतेच्याच बहिणी उर्मिला, श्रुतकीर्ती आणि मांडवी यांचेशी झाले. त्यानंतर रामाने शिवधनुष्य मोडले म्हणून क्रुद्ध झालेल्या परशुरामाचे रामाशी युद्ध होते. पण रामाने त्याचेही गर्वहरण केले. रामसीता अयोध्येत असतांनाच राजा दशरथाने रामाला राज्याभिषेक करून राजसिंहासनावर बसविण्याचे ठरविले पण रामाची सावत्र माता कैकेयीने भरताला राज्य, रामाला चौदा वर्षे वनवास असा वर मागितला तेव्हा मातेची आज्ञा शिरसावंद्य मानून कर्तव्यनिष्ठेने राम सीता लक्षण तिघेही वनवासात गेले. ते पाहून दशरथ राजा मूर्च्छित होऊन मृत्यु पावला.

वनवासात लंकेतील राक्षसांचा राजा रावणाने साधुचा वेष घेऊन सीता हरण केले. सीतेचा शोध घेत असतांनाच राम लक्ष्मणांशी सुग्रीव, हनुमान यांच्याशी मैत्री झाली. हनुमानाच्या सहाय्याने सीतेचा शोध घेतला. लंकेवर स्वारी केली आणि रावणाशी युद्ध करून राक्षस वंशाचा समूळ नाश केला. रावणाचा धाकटा बंधू बिभीषण याला लंकेच्या राज्यावर बसवून राम सीता लक्ष्मण अयोध्येत परतले. रामसीता राज्यारूढ झाले व आदर्श रामराज्य सुरू झाले. पण जनतेने सीतेच्या चारित्र्या विषयी शंका घेतली. त्यामुळे रामाने गर्भवती सीतेचा त्याग केला. वैयक्तिक जीवनापेक्षा प्रजापालनदक्षता, कर्त्यव्यनिष्ठ रामाला विशेष महत्त्वाची वाटत होती. एकपत्नीत्वाचा आदर्श ठेवून रामाने अश्वमेघ यज्ञ केला. सीतेची सोन्याची मूर्ती बनवून सहधर्मचारिणी म्हणून तिचा मान केला. पुढे याच यज्ञप्रसंगी वाल्मीकी ऋषी सीतेची मुले रामकथेचे गीतगायन करण्यासाठी लवकुश यांना घेऊन येतात. ही दोघेही सीतेचीच मुले असल्याची ग्वाही देतात. सीताही तेथे हजर होते परंतु तिचे

जीवनकार्य संपल्यामुळे ती धरणीत अंतर्धान पावते. कालांतराने लक्ष्मणाचाही वध होतो. त्यामुळे राम आपले राज्य लवकुशांवर सोपवून स्वतःही शरयु नदीत आत्मसमर्पण करतो. अशी ही रामसीतेच्या जीवनाची करूण रसप्रधान अमर कहाणी आहे. राम लक्ष्मणाच्या पराक्रमाची गाथा आहे.

या रामकथेत अनेक कथा–उपकथांचा समावेश आहे.

वाल्मीकींच्या काळात रामकथेची अनेक रूपे गायनाच्या स्वरूपातून, गाथांच्या, कीर्तनांच्या स्वरूपातून अस्तित्वात होती. या प्रचलित कथांचे संकलन करून वाल्मीकीनी 'रामायणग्रंथाच्या स्वरूपात त्यांना सुंदर विस्तृत महाकाव्याचे रूप दिले. वाल्मीकीनी तत्कालीन समाजाचे वास्तव जीवन, सामाजिक समस्या, दुष्ट प्रवृत्तीषी संघर्ष करून विजय मिळवणारी वास्तवपूर्ण कथा रामायणाच्या स्वरूपात साकार केली. त्यासाठी रामासारखा भव्योदात्त व्यक्तिमत्वाचा लोकनेता मर्यादा पुरूषोत्तम राम महाकाव्याचा नायक म्हणून निवडला.

रामायणात रामकथा प्रमुख असली तरी तत्कालीन सांस्कृतिक, ऐतिहासिक, धार्मिक, राजकीय, सामाजिक, आर्थिक, परिस्थितीवर विस्तृत प्रकाष पडतो. राष्ट्रनिर्मितीत रामायणाचे सर्वात मोठे योगदान आहे. ध ार्मिक दृष्टीने तत्कालीन आचरण सत्य, कर्तव्यनिष्ठा, विविध यज्ञ, व्रत, नैतिकता, ईष्वरभक्ति यांचा पूर्ण इतिहास रामायणात आढळतो.

राजकर्तव्य, नेता–मंत्री–सेवक यांची निवड, मंत्रिमंडळाची स्थापना, राजाधिकार, प्रजापालन, प्रजाधर्म, संपत्ति अधिकार, नागरिकत्व, सैन्यसंचालन, व्यवस्थापन इत्यादि राजकीय ज्ञानाचा ज्ञानकोष रामायणात दृष्टीस पडतो. आदर्ष राज्याची संकल्पना आदर्ष रामराज्यांच्या स्वरूपात सुंदरपणे साकारली आहे.

संपूर्ण आषिया खंडात रामकथा लोकप्रिय ठरली असून रामकथेच्या विष्वव्यापक प्रसाराचे श्रेय वाल्मीकी ऋषींनाच दिले पाहिजे.

भारताची संस्कृती, इतिहास, साहित्य, कला, विज्ञान, समाजकारण, राजकारण, व्यवस्थापन या सर्वच क्षेत्रांची उदात्तता रामायणाने दिकवली आहे. आजच्या कलियुगातही दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्षन करण्याचे सामर्थ्य रामायणात आहे.

ब्रिटिषांच्या काळात जर्मन संषोधक याकोबी, विंटरनिटस लॅसेन यांनी रामायणावर संषोधन केले. या सर्वांमध्ये लॅसेन हा जर्मन संषोधक अग्रगण्य मानला जातो. रामायणाचे ऐतिहासिक, साहित्यिक, सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय महत्त्व पुढीलप्रमाणे आहे.

## रामायणाचे साहित्यिक महत्त्व –

वाल्मीकी रामायण हे भारतीय संस्कृतीतील आदर्ष जीवनमूल्यांचा अक्षयनिधी असून साहित्यिक मूल्यांचा आदर्ष प्रस्थापित करणारे जगातील पहिले ललित महाकाव्य आहे. वैदिक विचारांचा प्रसार करून वाल्मीकींनी आर्यांच्या गौरवषाली जीवनाला रसपूर्ण, मधूर आणि अलंकृत भाषाषैलीत प्रस्तूत केले. वाल्मीकींच्या अलौकीक प्रतिभासामर्थ्याने कल्पना सामर्थ्याने रामायण महाकाव्य भव्योदात्त झाले आहे.

वाल्मीकी रामायणाची चार संस्करणे उपलब्ध आहेत.

1) मुंबईचे देवनागरी संस्करण – निर्णय सागर प्रेस – मुंबई येथे प्रसिध्द झाले (1902)

2) बंगालचे संस्करण – कलकत्ता येथे प्रकाषित झाले

3) कष्मिरी संस्करण – लाहोर येथून प्रकाषित झाले (1913)

4) दक्षिण भारत संस्करण – मद्रास येथून प्रकाषित झाले.

## 1) उपजीव्य ग्रंथ (आधार ग्रंथ)

रामायणाची वरील चार संस्करणे प्रमूख असून त्यात अनेक कथा उपकथा मागाहून जोडल्या गेले वा रामायणात भारतीय संस्कृतीच्या सर्व क्षेत्रातील आदर्षांचे सर्वस्पर्षी दर्षन घडविले असल्यामुळे सर्व प्रतिभावंत कवींना विविध साहित्यकृती रचण्यासाठी हा आधारग्रंथ वाटू लागला.

**परं कवींना आधारं समाप्तं चं यथाक्रमम् (1.43 वा.स)**

असा दृढविष्वास वाल्मीकीनी व्यक्त केला आहे. धर्म, अर्थ काम मोक्ष या चार पुरूषार्थांची फलप्राप्ती करून देणारे, पाठ्य आणि गेयतेच्या बाबतीत मधुर आणि तत्कालीन काव्यात सर्वोत्तम अषी ग्वाही रामायणातच वाल्मीकींनी दिली आहे. संपूर्ण महाकाव्यात नियमित असे एकच अनुष्टुभ छंद संपूर्णपणे वापरलेले दिसून येते. काही ठिकाणी सर्गांच्या शेवटी इन्द्रवज्रा व उपजाति छंदांचा प्रयोग आढळतो.

## वाल्मिकीची रामकथा

### 2) आदर्श जीवनमूल्ये व आदर्श काव्यगुण, नाटयगुण –

कथा उपकथांची सुव्यवस्थित गुंफण, रामसीता लक्ष्मण यांची आदर्षपात्रे, रसपूर्ण प्रसंगयोजना, स्वाभाविक अलंकार, कल्पकता प्रसाद आणि माधुर्य गुणांची वैदर्भीरीती इत्यादि काव्यगुण आणि कलात्मक तंत्राची मांडणी, वाद, संवाद, स्वगते हे नाटयगुण जागोजागी पहावयास मिळतात. अनेक सुभाषिते, वाक्प्रचार, लोकजीवनाषी निगडीत असलेल्या म्हणी इत्यादि साहित्यिक गुणांबरोबरच आदर्ष जीवनमूल्यांचे संस्कार रामायणाने पिढयान् पिढया जनमानसावर केले. त्यामुळे काव्य–नाटयगुणांना अर्थपूर्णता आली. म्हणूनच परवर्ती नाटककारांना साहित्यिकांना रामायणकाव्य उपजीव्य म्हणजेच आधारग्रंथ ठरले.

### 3) आदर्श व्यक्तिचित्रणे –

वाल्मीकीरामायणात राम हा आदर्श मानवाच्या रूपात दृष्टीस पडतो. सामान्य मानवाप्रमाणेच त्याने अतोनात दुःख भोगले, त्याग, सहनशीलता, कर्तव्यनिष्ठा, आज्ञापालन, प्रखर बुद्धिमत्ता आणि पराक्रमाच्या जोरावर प्रजेला जिंकले. कोणत्याही भावभावनांच्या आहारी गेला नाही म्हणून रामाला ‘मर्यादा पुरुषोत्तम राम’ म्हणतात. राम सीता या दोघांनीही एकपत्नी व्रताचा तसेच एक पतिव्रतेचा आदर्श ठेऊन बहुपत्नित्वाची प्रथा असलेल्या समाजात क्रांती घडवून आणली.

आदर्ष पतीपत्नी रामसीता, आदर्ष बंधु लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, आदर्ष सेवक हनुमान, आदर्ष मित्र सुग्रीव, विभीषण आदि पात्रांच्या रूपाने वाल्मीकींनी अभिप्रेत असलेली जीवनावष्यक आदर्ष जीवनमूल्ये रंगविली. सज्जनांचे नीतिसंपन्न आदर्ष जीवन दर्षविले. तसेच कैकेयी, रावण, कुंभकर्ण, इन्द्रजितादि पात्रांद्वारे दुर्जनांचे क्रौर्य, स्वार्थीपणा कपट कारस्थाने रंगवून दुष्टांच्या कारस्थानाला बळी न पडण्याचे चातुर्यही षिकविले. आजही भारताचे सांस्कृतिक जीवन उंचावण्यास ही आदर्ष पात्रे मार्गदर्षन करीत आहेत. चुकलेल्यांना वाट दाखवित आहेत. योग्य मार्गावर चालणाऱ्यांना दिलासा देत आहेत.



### 4) आदर्श महाकाव्याची लक्षणे –

पवर्त, नद्या, सूर्य, चन्द्र यांची भावपूर्ण निसर्गचित्रणे, नगर ग्रामस्थांना वर्णन कौषल्य, उत्कट रसाभिव्यक्ती इत्यादि काव्यगुणांमुळे रामायण महाकाव्यावरून पुढील काळातील साहित्यषास्त्रज्ञांनी उत्कृष्ट महाकाव्याची लक्षणे तयार केली. 'रामदिवत् वर्तितव्यम् न तु रावणादिवत्' असा नियम घालून दिला. महाकाव्यात तसेच नाटय, कथा कादंबरी इत्यादि साहित्य प्रकारात कोणत्या महत्वपूर्ण बाबींचा विचार केला जातो. याचा उलगडा वाल्मीकी रामायणाच्या अध्ययनातुन होतो. सर्गबध्द कथा, उदात्त नायक नायिका, रसानुकुल निसर्गवर्णने अषी लिखित महाकाव्याची लक्षणे ठळकपणे सर्वप्रथम रामायणातच पहावयास मिळतात. भारताबाहेर रामायणाचा प्रसार वीरकाव्य व धार्मिक काव्य म्हणून झालेला आढळतो.

## 5) उत्कृष्ट साहित्याचा आदर्श

भाषागत अभिप्राय वाक्प्रचार म्हणी, लोकन्याय, भाषेची प्रासादिकता, माधुर्य रामायणातच प्रथम प्रयुक्त झाले. श्रृंगार, वीर, करूण, हास्य, रौद्र, अद्भूत, भयानक, शांत अषा सर्व रसांचा आविष्कार रामायणात आढळतो. रसाभिव्यक्तीसाठी हजारो उपमानांचा सर्वप्रथम प्रयोग रामायणात केला गेला. अन्यायाप्रति आक्रोष, क्षोभ, परदुःखकारकता, निसर्गाविषयी सज्जनांविषयी आपुलकी, आदर्ष जीवनमूल्ये, उत्कृट व्यवहार ज्ञान महकाव्यातून व्यक्त झाले पाहिजे हा उत्कृष्ट साहित्याचा आदर्ष वाल्मीकीनी रामायणाद्वारे परवर्ती साहित्यिकांसाठी घडविला. उत्कृष्ट महाकाव्याची प्रथम कल्पना रामायणाच्या साहित्यिक विष्लेषणातून साहित्यकारांना गवसली म्हणून **वाल्मीकी** हा **'पहिला क्रान्तदर्शी कवी'** असे म्हटले जाते. तर रामायणाला **'संस्कृत महाकाव्याचा अरूणोदय'** समजले जाते. रामायणाचा आरंभ शोकापासून होतो व रामायणाच्या शेवटीही सीता पृथ्वीच्या उदरात अन्तर्धान पावते. असा करूणरस आद्यन्त व्यापला असल्यामुळे रामायण करूणरसप्रधान महाकाव्य मानले जाते. काव्याचे स्वरूप, रस ध्वनि, गुण अलंकार, रिती, यांचे सूक्ष्म संकेत रामायणातून प्रकट झालेले दिसतात. जनसामान्यांच्या हृदयाला भिडणारी क्षमता, कथांषाची नित्य– नूतनता, भावप्रवणता, रसपूर्णता,

आदर्ष जीवनमूल्ये आणि रामायणाची लोकप्रियता हे सारे काही ध्यानात घेऊन साहित्यषास्त्रज्ञ आनन्दवर्धनाने ध्वनिसिध्दान्ताचे निर्धारण करताना. सर्वप्रथम रामायणाला मानदण्ड मानले, अषाप्रकारे रामायणाच्या रचनेने साहित्याच्या शास्त्रीय चिन्तानालाही जागृत केले आहे.

अषाप्रकारे रामायणाच्या साहित्यिक वैषिष्टयांचे अनुकरण करून भास, कालिदास, भवभूति राजषेखर, मुरारी, जयदेव इत्यादि अनेक संस्कृत साहित्यिकांनी आपल्या कल्पना सामर्थ्याने, प्रतिभासामर्थ्याने रामकथेवर आधारित अनेक नाटके काव्ये कथा कांदबऱ्या रचल्या व रामकथेला नवे रूप दिले व आपले काव्यरचनाकौषल्य प्रदर्षित करण्यास यषस्वी ठरले.

**6) कलाविकास**

रामायणातील रसाळ प्रसंगवर्णने व्यक्तिचित्रणांवरून षिल्पकारांनी चित्रकारांनी आपल्या षिल्पकला चित्रकला देखील विकसित केल्या. गेयता आणि पदलालित्य या रामायणाच्या काव्यगुणांमुळे गीतकारांनी गायनकलाही विकसित केली. म्हणूनच वाल्मीकी रामायण या महाकाव्याला उपजीव्यकाव्य असे म्हणतात. (आधारग्रंथ)

मानवी जीवनाच्या सर्व क्षेत्रांना उजळून टाकणारा हा महान नन्दादीप आहे. या उपजीव्य काव्याची महत्ता जाणून समर्थ रामदास स्वामी म्हणतात ‘रामकथा ब्रम्हांड भेदून पल्याड न्यावी। रामायणाची लोकप्रियता कल्पान्तापर्यंत टिकणारी आहे असे वाल्मीकी रामायणातच सांगितले आहे.

**यावत्स्थास्यन्ति गिरयः रसितश्च महितले।**
**तावद्रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति।।**
**रम्या रामायणी कथा।**

## वाल्मीकी रामायणाचे ऐतिहासिक महत्त्व

'इति इह आस इति इतिहास' – हे इथे असे घडले म्हणजे इतिहास असा 'इतिहास' शब्दाचा स्थूल अर्थ आहे. सर्वसाधारणपणे इतिहास म्हणजे भूतकाळातील अशा गोष्टीची नोंद की ज्यामध्ये मानवी मनाचा विकास, मानवी बुद्धीमत्तेचा विकास आणि ऱ्हास दिसून येतो. आणि यांचा उपयोग आपल्या चांगल्या आदर्श राहणीमानासाठी कसा करता येईल, सुव्यवस्थित समाज कसा घडविता येईल यासाठी केला जातो. म्हणून इतिहासात मानवाच्या वैशिष्ट्यपूर्ण कल्पना विचार आणि कार्य यांचा उल्लेख असतो. म्हणून इतिहास हा मानवी प्रगतीचा संपूर्ण आलेख होय. असे म्हटले जाते.

घडलेल्या घटनांचे जसेच्या तसे वर्णन करून त्या घटनांचा अन्वयार्थ लावून विश्लेषण करणे व त्याचे महत्त्व समाजापुढे मांडणे म्हणजे इतिहास होय.

इतिहासकार ज्या काळात इतिहासलेखन करतो त्या काळातील सामाजिक तात्विक धार्मिक, आर्थिक, सांस्कृतिक कल्पनांचा प्रभाव त्याच्यावर असतो त्यामुळे त्याकाळातील कल्पनांविषयी त्याच्या मनात एक दृष्टिकोन तयार होतो. त्यामुळे त्या कल्पनांच्या अनुषंगाने तर कध ी त्या कल्पनांच्या विरूद्ध वर्णन करतो. त्या घटनांच्या पाठीमागे असलेल्या प्रेरणा, हेतु, उद्देश, संवेदनशीलता, सहानुभुती तिरस्कार यांचा कमी अधिक प्रभाव इतिहासकारावर पडतो. त्यामुळे घडलेल्या घटनांचे वस्तुनिष्ठ वर्णन न करता ते कल्पनारम्य पद्धतीनेही इतिहासकार वर्णन करतो.

वाल्मीकि रामायण हे सत्य घटनेवर महाकाव्याचा साज चढविलेले ऐतिहासिक महाकाव्य आहे. याचा प्रत्यक्ष पुरावा वाल्मीकि रामायणातच आढळतो.

'पूजयंश्च पठश्चैनं इतिहासं पुरातनम्' युद्धकाण्ड सर्ग 128 / 114 वाल्मीकि रामायण तसेच विष्णुधर्मपुराणात सांगितलेली इतिहासाची व्याख्या रामायणालाही लागू पडते.



धर्मार्थकाममोक्षाणां उपदेशसमन्वितम् ।

पूर्ववृत्तं कथायुक्तं इतिहासं प्रचक्षते।। विष्णुधर्मपुराण (3.15.1)

धर्म, अर्थ, काम मोक्ष या चार पुरूषार्थांची प्राप्ती करून देणाऱ्या उपदेशांनी युक्त असलेल्या कथायुक्त, पूर्वचरिताला 'इतिहास' असे म्हणतात. या दृष्टीने वाल्मीकि रामायणाचा अभ्यास केला असता असे आढळते की, कृतज्ञता, धर्मज्ञता, आत्मसंयम, कठोर आज्ञापालन, सत्यता, अहिंसा, स्वार्थत्याग, सेवाभाव इत्यादि चतुर्विध पुरूषार्थाची प्राप्ती करून देणारी जी शाश्वत मूल्ये वैदिक वाङ्मयापासून आपल्या संस्कृतीत आदर्श मानली गेली त्यांनाच वाल्मीकिंनी इक्ष्वाकुवंशासारख्या ऐतिहासिक राजकुलाच्या चरित्रकथातून साकार केले आहे. इक्ष्वाकुवंशाचा प्रतिनिधी असलेला राम सर्व सद्‌गुणांचा निधी असून या महत्तम विभूतिमत्त्वाच्या भोवती महर्षी वाल्मीकिंनी भारतीय संस्कृतीच्या इतिहासाची गुंफण केली आहे. पित्याच्या आज्ञेने रामाचे वनवासगमन, रामाद्वारे राक्षसांचा संहार, सीताअपहरण, हनुमानाद्वारे सीतेचा शोध, लंकेच्या महायूद्धात रामाचा रावणावर विजय इत्यादि घटनांचे यथार्थ वर्णन करणारे हे महाकाव्य निश्चितच ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वपूर्ण आहे. या संदर्भात पाश्चात्य विद्वान मॅकडोनेल याने वाल्मीकि रामायणाला आर्यसंस्कृतीचे ऐतिहासिक रूप मानले आहे. इक्ष्वाकुल, जनकादि राजवंश, सुग्रीवादि वानरसंघ, रावण विभीषणादि राक्षसकुल, ऋषीमुनी या साऱ्यांच्या जीवनाद्वारे वाल्मीकिंनी संस्कृतीच्या सर्व थरातील, सर्व क्षेत्रातील आदर्शांचे दर्शन घडविले आहे. त्याचबरोबर वाल्मीकी रामायणात देव, मानव, वानर, राक्षस अशा चतुर्विध मानवंशाचा व त्यांच्या संस्कृतीचा जो इतिहास मांडला गेला आहे त्याचा संक्षिप्त परिचय पुढीलप्रमाणे –

1. **देवजाती** – देवजाती ही अतिप्राचीनकाळी एक पुढारलेली जात होती. दशरथ राजा व इतर आर्य राजे वेळप्रसंगी देवांना देवलोकी युद्धात सहाय्य करण्यासाठी गेले होते. पुष्कळ आर्य राजानी तप करून इन्द्रपद प्राप्त केले होते. जनकराजाला मिथिला नगरीत सीतेच्या निमित्ताने आर्यराजांनी वेळ दिला त्यावेळी देवसैन्याने जनकाला साहाय्य केले. तेव्हा मिथिला नगरीचे रक्षण झाले. (बालकाण्ड 66/15 ते 26).

रामरावण युद्धातही इन्द्राने रामासाठी रथ पाठविला. इन्द्राने गौतमपत्नी

अहल्येशी प्रत्यक्ष गौतमाचा वेष घेऊन व्यभिचार केला. इत्यादि अनेक कथा प्रसिद्ध आहेत. यावरून देवजाति ही मानवजाती होती. संकटकाळी आर्यराजांना साध्य करणारे देव हे मानववंशापैकीच अत्यंत शक्तिमान वीर होते हे पण्डित सातवळेकरांनी सिद्ध केले आहे.

**2. नरमानव आर्य – 'आत्मानं मानुष्यं मन्ये रामं दशरथात्मजम् ।'** (युद्धकाण्ड सर्ग 117/11) वाल्मीकि रामायणातील या रामाच्या वचनातून राम हा मानव असून तो ऐतिहासिक पुरुष आहे हे लक्षात येते. हा राम ज्या कुळात जन्माला त्या इक्ष्वाकुकुळाला स्वतःची एक सुसमृद्ध परंपरा आहे. या इक्ष्वाकुकुळाचा उल्लेख वाल्मीकी रामायणात ठिकठिकाणी आढळतो. मनु–इक्षाकुपासून रामापर्यन्तचा एकसष्ट पिढ्यांचा इतिहास रामायणात आढळतो. अयोध्या कोसल, शरयु यांच्या वर्णनातून इक्ष्वाकु वंशातील राजर्षींच्या जन्माच्या त्याच्या दिग्विजयाच्या, यज्ञासंबंधीच्या ज्या कथा आढळतात त्या ऐतिहासिकदृष्ट्या महत्वपूर्ण आहेत. सर्वसंहारक जलप्रलयापूर्वी भारत होता. त्यातही मनुष्यवस्ती होती त्यांना संस्कृती होती. आमच्या इतिहासाला माहित असलेला पहिला राजा म्हणजे प्राचीन बर्हि. त्याचे दहा वंशज झाल्यावर अकरावा जो झाला त्याचे नाव प्रचेत. त्याचा मुलगा प्राचेतस दक्ष. दक्षाची पत्नी अदिती हिचा मुलगा विवस्वान याचा पुत्र मनु ह्यालाच वैवस्वत मनु असे म्हणतात. वैवस्वत मनुला इला नामक कन्या व नऊ पुत्र झाले. त्यापैकी जेष्ठ पुत्र ईश्वाकु याला मनुचे राज्य मिळाले. या इक्ष्वाकुने एक तटबंदीयुक्त नगरी वसवली. तिच्यावर बाहेरून हल्ला करणे अयोग्य होते म्हणून तिला अयोध्या असे म्हणतात. इक्ष्वाकुने ईक्षुंची लागवड केली म्हणून त्यांना इक्ष्वाकु असे नाव पडले. याच वंशात अनेक पराक्रमी राजे निर्माण झाले म्हणून त्यांना भारताचे सम्राटपद मिळाले. इक्ष्वाकु ते राम अशा ऐंशी पिढ्यांचा तसेच सीतेच्याही 25 पिढया आधीचा इतिहास रामायणात आढळतो. याविषयीचे उल्लेख बालकांड, अयोध्याकाण्ड, उत्तरकाण्ड यात आढळतात. एकंदरीत पंधरा हजार वर्षापूर्वीच्या ऐतिहासिक घटनांचे वर्णन वाल्मिकी रामायणात आढळते असे डॉ.प.वि. वर्तक यांनी 'वास्तव रामायण' या ग्रंथात म्हटले

आहे. इक्ष्वाकु वंशातील राजांची प्राचीनमनुपासून रामापर्यन्त जी वंशावळ आढळते ती अशी –

1. प्राचीन बर्हि – दहावापुत्र प्रचेत– प्राचेतस – दक्ष – अदिती – विवस्वान पुत्र (7) मनु (8) इक्ष्वाकु – कुक्षि (10) विकुक्षि (शशाद) – ककुत्स्थ – वेन (बाण) – अनेना – प्रथु (15) विश्वरंध्रि – चंद्र – धुवनाश्व – श्राव – श्रावस्त – बृहदश्व (21) कुवल्याश्व (धुंधुमार) (28) दृढाश्व – प्रमोद – हर्यश्व – निकुंभ – बर्हणाश्व – कृताश्व – श्येनजित (प्रसेनाजित) (29) युवनाश्व (दुसरा) (30) मांधाता – पुरूकुत्स मुचकुंद त्रसदस्यु – संभूत (34) अनरण्य – सुधन्वा–त्रिधन्वाह्य त्रय्यारूण (38) सत्यव्रत – त्रिशंकु – हरिश्चन्द्र– रोहित–हरित–चंचु– सुदेव–विजय–रूरक– वृक–बाहु (48) सगर–असमंज (50) अंशुमान (51) दिलीप – भगीरथ – श्रृतृ नाभाग (55) अंबरीष (56) सिंधुद्विप अयुताजित–ऋतुपर्ण (नळराजाचा मित्र) आर्तपर्णि (60) सुदास (61) कल्पाषपाद (पली मदयंती) अग्मक – सर्वकर्मा – अनरण्य निघ्न – अनमित्र – दुलिदुह (68) दिलीप (दुसरा) – दीर्घबाहु (70) रघु – पृथुश्रवा – अज – दशरथ (71) राम–लक्ष्मण– भरत–शत्रुघ्न (72) कुश–लव ईक्ष्वाकुला कुक्षी व निमि हे दोन पुत्र झाले. त्यांपैकी जनकराजा हा निमिच्या वंशातील आहे. बालकांड – सर्ग 70 श्लोक 14–45) (सर्ग 71.3,4) ईक्ष्वाकुवंशातील पूर्वजांच्या इतिहासाबरोबरच रामाच्या पूर्व अवतारांचाही उल्लेख आढळतो. तसेच बारा आदित्य, अकरा रूद्र, आठ वस्तु दोन अश्विनीकुमार अशा 33 प्रमुखदेवतांचाही उल्लेख आढळतो. कुबेर, कार्तिकेय, गंगा, लक्ष्मी यम, वायु इत्यादि देवतांचे. ब्रह्मा विष्णु, रूद्र इन्द्र या वैदिक देवतांचे उल्लेख आढळतात. यादृष्टीने रामायणातील नरमानव आर्य व देवजाती यांचे उल्लेख मानववंशाचा इतिहास जाणण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहेत. तसेच महत् धर्मतत्त्वाच्या सिद्धीसाठी चाललेले राम–रावणयुद्ध हे प्रागैतिहासिक काळातील पहिले महायुद्ध असल्यामुळे ते महत्त्वपूर्ण आहे. नव्वद दिवसांचा प्रदीर्घ काळ लांबलेली, एक महापत्र इतक्या विशाल संख्येच्या सैन्याचा बळी घेणारी राम रावणयुद्धाची घटना

म्हणजे भव्य उदात्त अशा भारतराष्ट्रातील अनेक रोमहर्षक प्रसंगांनी फुलुन निघालेला महान इतिहास आहे. ईक्ष्वाकुकुळातील राजपरिवार प्रत्यक्ष राजा, सर्वसामान्य प्रजाजन, ऋषीमुनी या सर्वांनीच आपापल्या ध र्माचे पालन करून जीवनात आदर्श मूल्यांचे अनुसरण करावे असा इतिहास निर्माण केला.

**रामायणकालीन राक्षस ही मानवजाती –**

वाल्मीकी रामायणात राक्षसकुळाचा जो इतिहास आढळतो तो पुढीलप्रमाणे आहे. राक्षसकुळात प्रहेति नामक दोन वन्धु राक्षसांचे बलाढ्या अधिपती होते. त्यापैकी प्रहेति हा अत्यंत धार्मिक होता तो तपश्चर्या करण्यासाठी तपोवनात निघून गेला. हेतिने भया नामक सूर्यकन्येशी विवाह केला. तिच्यापासून त्याला विद्युत्केश नामक पुत्र झाला. याने सन्ध्या नामक राक्षसीची कन्या सालकटंकटा हिच्याशी विवाह केला. या सालकटंकटेपासून विद्यूत्केशाला सुकेश नामक पूत्र झाला त्याच्या मातेने तो जन्मल्याबरोबर त्याला मन्दराचलावर टाकून दिले. तेव्हा पार्वतीने त्याचे संगोपन केले. सुकेश अत्यंत धार्मिक असून त्याने भगवान शंकराला प्रसन्न करून घेतले. ते पाहून सुकेशाला ग्रामणी गन्धर्वराजाने देववती नामक कन्या दिली. या देववतीपासून माली सुमाली माल्यवान नामक बलवान ज्ञानी व पराक्रमी असे तीन पुत्र झाले. या तीघांनाही घोर तप करून भगवान् ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतले. त्यापासून मोठमोठे वर संपादन केले आणि लंकेमध्ये जाऊन वसाहत केली. तेथे ते राज्य करू लागले. नर्मदा नामक गन्धर्वकन्येच्या केतुमती वसुदा व सुंदरी या तीन कन्या होत्या त्यांचा क्रमाने माली, सुमाली, सुंदरी यांच्याशी विवाह झाला. ही कैकसीच रावणाची जन्मदात्री माता होय. ही कैकसी प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा नातु जो विश्रवा ब्रह्मर्षि त्याला दिली होती. या विश्रवा ब्रह्ममहर्षीपासूनच कैकसीच्या पोटी रावण, कुंभकर्ण, शुर्पणखा, बिभीषण ही अपत्ये जन्मली. रावण हा प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा पणतु व विश्रवा हा ब्रह्मर्षीचा पुत्र आहे. या रावणाला दैत्यराज मयासुर याने आपली कन्या मन्दोदरी विवाहविधीने दिली अशी ही राक्षसांची कुलपरंपरा आहे.



ईक्ष्वाकु कुलातील राम व राक्षसकुलातील रावण यांची कुलपरंपरा

पुढील आलेखावरून स्पष्ट होते.



**अदितिपुत्र विवस्वान (3.14.14)**

मनु (प्रजापति) 1.70
|
इक्ष्वाकु 1.70
|
कुक्षि (तत्रैव)
|
बाण
|
अनरण्य
|
पृथु
|
त्रिशङ्कु
|
धुन्धुमार
|
युवानाश्व
|

मान्धाता
|
सुसन्धि
|
ध्रुवसान्धि प्रसेनजित
|
भरत
|
असित
|
सगर
|
समचस
|
अंशुमान
|
दिलीप
|
भगीरथ
|
ककुत्स्थ
|
भगीरथ
|
ककुत्स्थ 1.70.2.110
|
रघु
|
कल्माषपाद सौदास
|
सुदर्शन
|
अग्निवर्ण
|
शीघ्रग
|
मरू
|
प्रशुश्रुक
|
अम्बरीष
|
ययाति 1.70.42
|
नाभाग (2.110.31)
|
अज (1.70) सुव्रत (2.11.31)

दशरथ (1.70.43)
(मरीचापासून 39 वा पुरुष)
|
राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न
|
(1.18) चन्द्रकेतु
7.66
|
कुश लव
(7.66)

या कुलपरंपरेतून राक्षसांची सोयरिक देव, दैत्य, गन्धर्व आणि मनुष्य यांच्याशी होती हे स्पष्ट होते. दैत्य, गन्धर्व, देव हे तपोबलाच्या योगाने उत्तरोत्तर श्रेष्ठत्त्व पावलेले मनुष्यच आहे. ज्याअर्थी या राक्षसांच्या सोयरिकी या सर्वांमधुन झाल्या त्याअर्थी हे राक्षस निश्चितच मनुष्य असले पाहिजेत. राक्षसांचे मनुष्यांशी आत्यंतिक साम्य होते हे युद्धकाण्ड सर्ग आठ व सुंदरकाण्ड सर्ग 9, 10 वरून ध्यानात येते.

राक्षसांचे आचार–विचार, धार्मिक संस्कार, व्यवहार, सामाजिक नीति, राजनीति मनोवृत्ति, शरीरयष्टि इत्यादिकांचे मनुष्यांच्या या सर्व गुणांशी पूर्णपणे साम्य आहे. त्याअर्थी राक्षस हे मनुष्याहून भिन्न असू शकत नाही. राम–रावण यांच्या युद्धावरून हा देव, आर्य वानर यांच्याविरूद्ध राक्षस असा मानवजातीचा संघर्ष असून तो ऐतिहासिकदृष्ट्या महत्वपूर्ण आहे.

राक्षस युद्धकलेत अत्यंत प्रवीण होते. राम–रावण युद्धप्रसंगी रामाचे सैन्य समुद्र किनाऱ्यावर येऊन ठेपले हे कळताच वज्रदष्ट्र नामक सेनापतीने रावणाला आकाशात सैन्याच्या तुकड्या उभ्या करून खाली असलेल्या सैन्यावर आक्रमण करण्याचा सल्ला दिला. (युद्धकाण्ड सर्ग 8) यावरून आकाशयुद्धाची कला राक्षसांना पूर्णपणे अवगत होती हे सिद्ध होते. आकाशात सैन्ये उभी करून युद्ध करण्याच्या योग्यतेची विमानासारखी साधने राक्षसांजवळ असली पाहिजेत हेही सिद्ध होते. बाणापेक्षा गदा, शक्ति इत्यादि शस्त्रांचा उपयोग करण्याकडे त्यांचा अधिक कल दिसून येतो. शस्त्रांबरोबरच वृक्षपाषाणादिकांचा ते उपयोग करित. मात्र त्यांनी अस्त्रविद्या प्राप्त केल्याचा उल्लेख रामायणात नाही. प्रामुख्याने मायाबलीचा प्रयोग केलेला आढळतो. इन्द्रजिताने अशाप्रकारचे युद्ध केल्याचे आढळते. त्यांच्या सैन्यात रथी, पदाती इत्यादि विभाग असत. उंट, खेचरे, गर्दभ यांचा वाहने म्हणून मोठा संग्रह असे.

राक्षसांच्या या युद्धकाण्डात सर्ग 10, 71 व 95 मध्ये आढळतो.

नरमांसभक्षण या युद्धकाण्डात सर्ग 10, 71 व 95 मध्ये आढळतो. नरमांसभक्षण व परदारहण मद्यपान ही दोन व्यसने राक्षसामध्ये प्रकर्षाने आढळतात. रावणाचे परदारहरण प्रसिद्धच आहे. (5. 27.5) राक्षसांच्या मद्यपानाचा उल्लेख सुंदरकाण्डात आढळतो. विश्वामित्रांनी केलेल्या नाटिकेच्या वर्णनात मनुष्यभक्षण करित असल्याचे सांगितले आहे. (1.25 / 14) रावणाने सीतेला 'वश न झाल्यास न्याहारीकरिता चिरून तुझे तुकडे करिन' अशी धमकी दिली यातूनही त्याचे नरमांसभक्षण वर्णनात सिद्ध होते. यज्ञाचा विध्वंस करणे हेही त्यांच्या रानटी आणि दुष्ट प्रवृत्तींचे द्योतक आहे. (1.30.12, 2..136. 14–17)

**राक्षसांच्या नीतिकल्पना**

सीतेचे अपहरण करण्यापूर्वी मारिचाने रावणाला सीताहरण न करण्याचा सल्ला दिला (3.38.26 ते 33) कबंधाने रामाला सुग्रीवाशी मैत्री करण्याचा सल्ला दिला. (3.72.8–9) लंकेवरील युद्धाचे संकट टाळण्यास रावणाने रामाला सीता परत द्यावी असा उपाय बिभीषणानेच रावणाला सांगितला. (6.9) या सर्व प्रसंगामधून राक्षसांच्या नीतिकल्पना मनुष्यांहून भिन्न नव्हत्या. परस्त्रीहरण निंद्य आहे याविषयी त्यांची एकवाक्यता दिसते. कुंभकर्णदेखील सीताहरणाच्या कार्यात प्रारंभापासून रावणाविरूद्ध होता. राजा सुविचाराने वागला नाही म्हणून असा अनर्थ ओढावला असे त्याने रावणाला ठणकावून सांगितले. परस्त्रीहरणाच्या लोभापायी रावणाने असे निंद्य कृत्य केले हे त्याच्या चरित्रावरून दिसते. मांसभक्षणात त्यांना पाप वाटत नसे. नरमांस भक्षण करित असले तरी त्यांचा उद्योग स्वतःच्या प्रदेशातील ज्ञातिबांधवांमध्ये दिसून येत नाही. कपटीपणा आणि असत्यवादित्व हे राक्षसांचे वैशिष्ट्य दिसून येते.

**राक्षसांची तपश्चर्या** – ब्राह्मणादिकांप्रमाणे राक्षसांची तपश्चर्या करण्याकडे प्रवृत्ती होती. पण ब्राह्मणांप्रमाणे त्यांच्या तपाचे साध्य पारलौकिक नव्हते. ऐहिक सुखोपभोगासाठी, त्यांनी तपश्चर्या केल्याचे दिसून येते. ऐश्वर्य अभिवृद्धि करणे, मृत्यु टाळणे या हेतुने राक्षसांनी तपश्चर्या केल्याचे आढळते. विरोधाने अनेक वर्षे तपश्चर्या करून शस्त्राच्या योगाने आपला वध होऊ नये शरीरावर छेद होऊ नये असा वर मागितला होता. (3.3.6) रावणाने तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला देव व असूर यांपासून अभयदान मिळविले (6.92.26) देव आणि असूर यांच्यामध्ये कितीही परस्परद्वेष असला तरी ब्रह्मदेवाविषयी सर्वांचा आदर सारखाच होता. राक्षसांची उपास्यदेवता देवी निकुंभिला हिचा उल्लेख रामायणात आढळतो. (5.24.47) (6.85.14)

**राक्षसांची विद्वत्ता** – राक्षसांच्या विद्वत्तेविषयी रामायणात बरेच उल्लेख आढळतात (5.18.2, 6.10.8) राक्षसांना वेदविद्या अवगत होती. राक्षसाधिपती रावण हा अग्निहोत्री होता असे वर्णन युद्धकाण्डात असून त्याच्या प्रेताचे दहन करताना त्यावर अग्निहोत्राची त्याची उपकरणे ठेवल्याचे वर्णन आहे. रावणाचा पुत्र अतिकाय हा अश्वारोहण, गजारोहण, तरवार धनुष्याकर्षण, या व्यतिरिक्त साम, दाम, दण्ड, भेद, राजनीति व मसलत या सर्व विद्यांमध्ये निष्णात होता. (6.71.29) असे सांगितले आहे.

कुंभकर्ण हा राजनीतिशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ यात निपुण होता तर महादर हा धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थक विषयक शास्त्रांमध्ये निपुण होता. (6.63.14 ते 16)

अशाप्रकारे राक्षसांच्या नीतिकल्पना, त्यांचे आचारविचार धर्म याविषयीच्या वर्णनातून राक्षस ही एक रानटी जात होती. मनुष्यप्राण्यांचा तो एक वर्ग होता. मनुष्यजातीचा ते द्वेष करित असले तरी ते त्यांच्याशी संबंध ठेवीत असत असे दिसते. रामायणातील राक्षसांचे हे वर्णन

ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वपूर्ण असून राक्षंसाविषयी रामायणात मनुष्य या नात्याने विचार केला आहे ही देखील महत्वाची बाब आहे.

**रामयणकालीन वानर :** वाल्मीकी रामायणात वानरांविषयी जो इतिहास आढळतो तो असा. मरिची व पुलत्स्य यांचा भाऊ पुलह नामक ऋषी होता. त्याचा पुत्र ऋक्ष या ऋक्षाच्या कुळात जाबुवंत व ऋक्षरजस झाले. जांबुवंत अस्वलांचा अधिपती होता. खालील प्रदेशात हे राहत असत. जांबुवंत वंशज आपल्या तोंडावर अस्वलीमुख बसवीत असत. ऋक्षरजस या वानराने किष्कंधा येथे राज्य स्थापन केले. अस्वले व वानरे बन्धभावाने एकविचाराने वागत. ऋक्षरजस निधन पावल्यावर त्याचा जेष्ठ पुत्र वाली राजा किष्किन्धेचा राजा झाला. त्याचा भाऊ सुग्रीव. वानरलोकात मैद, द्विवीद, नील, तार, नळ, रंभ हे श्रेष्ठ वानर होते. तार नामक वानरांची कन्या तारा. हिच्याबरोबर वालीने लग्न केले. सुग्रीवाच्या पत्नीचे नाव होते रुमा. नल हो वानरश्रेष्ठ, मय किंवा विश्वकर्मा यांच्यासारख्या स्थापत्य विशारद होता. (उत्तरकाण्ड सर्ग 36) हनुमान प्रचंड ताकदीचा अतिबुद्धिमान राजकाणपटु मन्त्री होता. ऋषी म्हणजे अस्वलातील प्रमुख लोक जांबुवंत, गज, गवाक्ष, गवय, सुदंष्ट वाली महापराक्रमी वानर होता. आपल्या पराक्रमावर बुद्धिबलावर याने आपले राज्य वाढविले. दक्षिणभारत आपल्या अंमलाखाली आणला. दण्डकारण्यात वालीचा प्रभाव वाढला याचवेळी दुन्दुभि नामक पराक्रमी राक्षसाने आक्रमण केले. या युद्धात वाली विजयी झाला तेव्हा रावणाने वालीशी मैत्री केली. वालीशी रावणाची गाठ पडताच त्याचे रावणाचाही पराभव केला. बंगालचा उपसागर अरबी समुद्र, हिन्दीमहासागर या तिन्ही किनाऱ्यापर्यन्त त्याने सत्ता स्थापन केली. शांतता व सुव्यवस्था निर्माण केली. उत्कृष्ट राज्यकर्ता म्हणून वाली प्रसिद्ध होता. असा वानरवंशाचा इतिहास वाल्मीकी रामायणातून कळतो.

याव्यतिरिक्त अयोध्या, लंका, किष्किंन्धा पंचवटी या नगरींचाही इतिहास रामायणातील अयोध्याकाण्ड, बालकाण्ड, किष्कंधाकाण्ड यात आढळतो.

किष्कंधाकाण्ड राम–सुग्रीव मैत्रीच्या प्रसंगी 'नरवानरौ' असा शब्दप्रयोग केलेला आढळतो.

एवमेकान्संपृत्की ततस्ततो नरवानरौ।
उभावन्योन्यसदृशं सुख दुःखमभाषत।।7.24।।

कित्येक ठिकाणी 'शाखामृग असेही म्हटले आहे. यावरुन सुग्रीव, हनुमान हे वानर होते हे निश्चितच पण हनुमानाचे वर्णन करताना रामाने पुढील शोकातून म्हटले,

नानृग्वेदाविनीतस्य नायजुर्वेदधारिणः।
नासामवेदविदुषः शक्यमेव विभाषितुम्।।
नूंन व्यकरणं कृत्स्यमनेन बहुधा श्रूतम्।
बहु व्याहरतानेन न किंचित् अपशब्दितम्।।

वा.रा. 4/3/28 ते 29

''ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद जो जाणत नाही त्याला असे। संस्कृतात भाषण करता येत नाही. याला व्याकरणशास्त्र पूर्णपणे ज्ञात असावे. कारण पुष्कळ बोलूनही याने अशुद्ध शब्द किंचितही उच्चारलेला नाही''. अशाप्रकारे वेदांचे ज्ञान असलेला, संस्कृतात बोलणारा, व्याकरणाचे ज्ञान असलेला ही विशेषण पाहिली म्हणजे वानर की एक मनुष्यांची जाती होती हे स्पष्ट होते. हनुमानाने भिक्षुरुप टाकून वानररुप घेतल्याचे सांगितले आहे. भिक्षुरुप घेणे पुनः वानररुप घेणे हे वेषान्तर माकडांकडून होणे शक्य नाही. सुग्रीवाच्या बलाढ्य सेनेत शतबळी, रंग, केसरी, शतकली, रंग केसरी, शबवाहन, मैन्द, द्विविद, गवाक्ष, नल, नील, दुर्मुख, जाम्बवान्, हनुमान अंगाद हे बलाढ्य सेनाप्रमूख होते. या वानरवीरांनी जी युद्धविद्या हस्तगत केली ता आर्ष व डोंगरी मुलुखाला साजेशी होती. (1.17126 ते 35) वृक्ष उपटणे, वहेत उंच झोके घेणे, गिरिप्रपाताप्रमाणे एखाद्याच्या अंगावर झेपावणे अशा युद्धकलेत ते प्रविण होते. याव्यतिरिक्त परशु, गदा, खड्ग, मुसळ, रथचक्र यांचाही त्यांनी उपयोग केलेला दिसतो. गदायुद्धात अंगद विशेष प्रविण आहे. त्याने इन्द्राजिताशी केलेल्या युद्धात गदेचा वापर केल्याचे आढळते. अंगदाची माता, वालीपत्नी तारा ही देखील राजहितदक्ष असल्याचे आढळते. (कि.काण्ड 23.13) नखप्रहार, मुष्टिप्रहार हेच वानरांचे आयुध होत. रावणाशी युद्ध करताना हनुमानाने वज्रमुष्टीचा तर कुंभकर्णाशी युद्ध करताना सुग्रीवाने मुष्टिचा

प्रहार केला. (युद्धकांड 76 / 64–98)

सीतेचा शोध घेत घेत रामलक्ष्मण ऋष्यमुक् पर्वतावर पोचले तेव्हा सुग्रीवही तेथेच होता. रामक्ष्मणांना पाहून त्याला वाटले वालीनेच आपल्या नाशासाठी या दोघांना पाठवले असावे. भीतीमुळे सुग्रीव ऋष्यमुक् पर्वतावरुन मध्ये पर्वतावर गेला व त्याने मारुतीला सांगितले, ''हे दोघे वालीचे मित्र असावेत. कपटाने संचार करणारे शत्रु मनुष्याने ओळखले पाहिजेत तू पुढे जाऊन उदासीन पुरुषाप्रमाणे त्याची परीक्षा बघ. त्यांच्या मनाचा कल पहा व येथे येण्याचे काय कारण ते विचार.'' यावरुन हे सुग्रीव, अंगद, हनुमानादि सेनाप्रमुख बुद्धीमान नरवानर असावेत हे स्पष्ट दिसते. (कि.काण्ड 2, 3) ''हनुमान संस्कृत भाषेत बोलतो, व्याकरणाचा अभ्यासू दिसतो.'' अशाप्रकारे रामाने केलेल्या हनुमानाच्या वर्णनावरुन हनुमान माणूसच होतो हे दिसते. वालिवध ानन्तर त्याची पत्नी तारा शोक करित, वालीजवळ आली व त्याला पाहून 'हे आर्यपुत्र....' एवढे बोलून बेशुद्ध झाली. यावरुन वाली हो देखील नरवानर असला पाहिजे. (कि.सर्ग 19)

वानरांच्या विद्या : हनुमान व्याकरणपंडित तर मैन्द हा नयापनयकोविद असल्याचा उल्लेख आढळतो. (6.17.47), (4 / 3 / 26). युद्धात लक्ष्मण मूर्च्छित झाला असता, सुषेणाने त्याला नस्य देऊन मूर्च्छेतून उठविल्याचे वर्णन आहे. ते त्याचा औषधीज्ञानाचे प्रतिक आहे. (6 / 101 / 24 ते 27) तसेच वालीची पत्नी तारा हिने देखील वेदाध्ययन केल्याचा उल्लेख आहे. तिला 'मन्त्रविद्' असे म्हटले आहे. (4.16.22)

**वानरांचा आहार :** वानर हे वनात राहून फलमूलावर 'उपजीविका करणारे' असे म्हटले आहे. हा आपला नैसर्गिक धर्म आहे असे वालिने रामाला सांगितले. (वानरांच्या स्वरुपाचे वर्णन

करताना त्यांना पुच्छ व अंगावर सर्वत्र लोम असल्याचे दाखविले आहे. ) हे त्यांचे एकच प्रमुख लक्षण पशुसदृश्य आहे. इतर वर्णन मात्र मनुष्यांशी जुळणारे आहे. तेव्हा वानरांना मनुष्य मानावे की पशु मानावे हा विवाद्य प्रश्न आहे. या सन्दर्भात 'श्रीरामायण समालोचन' या ग्रंथाचे लेखक 'महाराष्ट्रीय' यांनी वानरांची बुद्धीमत्ता, संभाषण करण्याची पात्रता, आहार, युद्धकला, विद्यासंपादन, त्यांना पुच्छ व रोम असणे या सर्व लक्षणांवरुन वानरांचे नरवानर व पशुवानर असे दोन भेद मानले आहेत. संभाषण करणारे, युद्ध करणारे, राजकारणपटु, विद्यासंपन्न वानर म्हणजे नरवानर, पुच्छ असणारे कंदमुळे खाणारे, वृक्ष उपटणारे, उंच झोके घेणारे, मुष्टिप्रहार करणारे ते पशुवानर असावेत. असे मत प्रतिपादन केले आहे ते समर्थनीय आहे.

अशाप्रकारे वाल्मीकि रामयणात देव, आर्य मानव, राक्षस, वानर यांच्या वंशाचा, त्यांच्या संस्कृताचा सविस्तर इतिहास आढळतो. म्हणून रामायणाचे महत्त्व एतिहासिक ग्रन्थाच्या बरोबरीचे आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. या सन्दर्भात श्री बाळशास्त्री हरदास म्हणतात : ''रामायण हा केवळ घटनात्मक इतिहास नसून तो सांस्कृतिक इतिहास आहे.'' हेही वचन रामयणाच्या ऐतिहासिक महत्त्वाला पुष्टि देणारे आहे.

## वाल्मीकी रामायणाचे राजनैतिक महत्व

वेदोपबृंहण म्हणजे वैदिक विचारांचा विस्तार हे रामायणाचे प्रध ाान कार्य आहे. आदर्ष जीवनमूल्यांबरोबरच वाल्मीकी रामायणातून राजकीय, सांस्कृतिक, ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक विचारांची आदर्षमूल्ये व्यक्त झालेली दिसून येतात.

वाल्मीकी रामायणाच्या अयोध्याकाण्ड, बालकाण्ड, अरण्यकाण्ड, युध्दकाण्डामधून राजनैतिक विचार व्यक्त झालेले आढळतात. ते आजच्या राज्यषास्त्राचेही आधारभूत सिध्दान्त मानले जातात. राजा, राजकर्तव्य, राजाचे महत्व, राजाची नियुक्ती, राज्याभिषेक, राजप्रासाद, राजाची दिनचर्या, राजा–प्रजा संबंधी, प्रषासकीय व्यवस्थापन, मंन्त्रणार विचारविनिमय सभा, परिषद, अमातसंस्था, न्यायव्यवस्था, करव्यवस्था, आन्तरराष्ट्रीय संबंध, दूत, दूर्ग बल युध्द याविषयीच्या चर्चेतून रामायणाचे राजनैतिक महत्व लक्षात येते.

1) युध्दकांडात (63.14.16) वाल्मीकी म्हणतात राजनीतिज्ञानाला अर्थषास्त्र आणि दण्डनीती (कायदेषास्त्र व्यवस्थापन) यांचे ज्ञान असणे आवष्यक आहे. राजनीति ही सत्यावर प्रतिष्ठित असली पाहिजे. कारण सत्ये धर्मः प्रतिष्ठितः असा ईक्ष्वाकु वंषातील राजांचा दृढविष्वास आहे. (अयोध्याकांड सर्ग 69)

**2) राजा आणि राज्याचे महत्व** – ज्या राष्ट्राला राजा नसतो तेथे अराजकता पसरते. अराजकता असलेल्या राष्ट्रात सभा, सम्मेलने उत्सव होत नसतात. राष्ट्रीय एकात्मता खंडित होते. प्रजा नम्रपणे वागत नाही. सुरक्षितता रहात नाही. मत्सन्यायाप्रमाणे सबळ दुर्बलांचा छळ करतात. म्हणून प्रत्येक राष्ट्राला राजा असणे अत्यंत आवष्यक आहे. राजा हाच सत्य आणि धर्माचा आदर्ष प्रवर्तक असतो. प्रजेचा माता–पिता असतो. अयोध्याकाण्डात 'नाराजके जनपदे' या पालूपदातून अराजकता पसरलेल्या राज्याची स्थिती सांगून राजाचे महत्व वर्णिले आहे. चांगले वाईट यांची सीमा सुरक्षित राखणारा राजा नसेल तर सर्वत्र अज्ञानाचा अंधार पसरतो. नीतिमत्तेचा वचक कमी

होतो. म्हणूनच राम वनवासात निघून गेल्यावर दषरथाच्या मृत्युनंतर दूत पाठवून ताबडतोब भरताला अयोध्येच्या राज सिंहासनावर बसण्यास बोलावण्यात येते. बालिवधानंतर सुग्रीव राजा होतो. रावणवधानंतर रामाने विभिषणाला लंकेच्या राजागादीवर बसविले.

**3) राजकर्तव्य** – प्रजापालनदक्षता हा खरा राजधर्म आहे. राजाने स्वपराक्रमाने कर्तव्यनिष्ठेने निःस्वार्थीपणे प्रजापालन केले पाहिजे. प्रजारक्षणासाठी जे जे करणे आवष्यक आहे ते रक्षणकर्त्याने केलेच पाहिजे. ज्याच्यावर राज्य कारभार सोपविला त्या राजाचा प्रजापालन हा सनातनधर्म आहे. (1.25.17 ते 19) अषाप्रकारे परखड राजधर्माचा मार्ग साठ पिढयांची दीर्घ परंपरा लाभलेल्या इक्ष्वाकुकुळाने सदैव अनुसरला, ईक्ष्वाकुवंषातील प्रभू रामचन्द्रानेही याच प्रजानुरंजनाचे काटेकोरपणे पालन केले. प्रजापालन दक्षता हे इक्ष्वाकु कुळाचे ब्रीद असून 'राजधर्म हा भोगधर्म नव्हे त्यागधर्म आहे.' हा त्यागधर्माचा दिवा ईक्ष्वाकुकुळाने सदैव प्रज्वलीत ठेवला. दुष्टांचे दमन, साधुंचे रक्षण करणे हे राजाचे कर्तव्य आहे.

राज्यात रोगराई निर्माण झाली, लोक नीतिभ्रष्ट झाले तर राजाला जबाबदार धरले जात असे, स्त्री–पुरूषांच्या तक्रारी ऐकून त्या दूर करणे हे राजाचे पहिले कर्तव्य होते. राज्यषासनाची योग्य व्यवस्था केल्याशिवाय राजाला राज्य सोडून जाता येत नव्हते. दषरथ राजाने प्रजेच्या अनुमतीने रामावर राज्य सोपविले. रामाने वनवासात जाताना भरतावर राज्य सोपविले.

**4) राजाचे गुणधर्म** – अयोध्याकाण्डात (सर्ग 3, सर्ग 100) राजाचे गुणधर्म सांगितले आहे. राजाच्या ठिकाणी आन्तंतिक विनयषीलता, विद्वता पराक्रम आत्मसंयम, निर्व्यसनीपणा, सत्याची पारख करणे, न्यायषीलता, सप्तधातुच्या कोषाने समृध्द, प्रज्ञानुरागी, पावित्र्य वृध्दांचा विद्वानांचा आदर करणे, राज्य व्यवस्थापनाची कला आत्मसात करून राज्यपालन करणे इत्यादि गुण असावेत, असा बहुगुणसंपन्न राजाच प्रजेला आनंदी ठेवू शकतो. ह्या राजगुणांचा परमोत्कर्ष रामाच्या ठिकाणी आढळतो.

**5) राजाची नियुक्ती** – राजाचा जेष्ठ पुत्र चारित्र्यसंपन्न असेल तरच तो राजपदाचा अधिकारी समजला जात असे. परंतु प्रजेला राजाची निवड करण्याचा पूर्ण अधिकार होता. लोकमताचा आदर करणे ही उत्कृष्ट लोकषाही जपणारी राज्यपध्दती रामायणकाळात होती. युवराज म्हणून रामाची निवड करताना दषरथाने प्रजेचे बहुमत विचारात घेतले. त्यानंतर प्रजा, सभेचे प्रतिनिधी आणि सामंत यांनी एकमुखाने रामाच्या नावाची घोषणा केली (अयोध्याकाण्ड सर्ग 3) राजपदावर आरूढ होणाऱ्या राजाला आनंदाने प्रजेने सहभागी होऊन राज्याभिषेक करावा असे विधान होते. (अयोध्याकाण्ड 4, युध्दकाळ) राजाचा प्रासाद अत्यंत भव्य असावा. त्यात अनेक मजले अनेक कक्ष होते. राजा अध्योध्येतील दषरथाच्या राजमहालात पाच ते सात चौक होते.

**6) राजा–प्रजा संबंध** – राजाने धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरूषार्थाच्या प्राप्तीसाठी धर्माचे पालन करणे व प्रजेकडून करवून घेणे हे राजाचे प्रमुख कर्तव्य होत. राजा ही लोकमताचा आदर करीत असे. प्रजेच्या मागणीनुसार राजा सगराने आपल्या वाईट वागणाऱ्या पुत्राला देषातून बाहेर हाकलून दिले. जेव्हा कैकेयीने रामाला चौदा वर्षे वनवास घोषित केला तेव्हा शोकाकूल प्रजेने आंदोलन करून पूर्ण विरोध दर्षविला. दषरथाच्या मृत्युनंतर या आंदोलनाला गंभीर स्वरूप आले. त्यामुळे मामाकडे गेलेल्या भरताला ताबडतोब आमंत्रित करण्यात आले. रामसीता अयोध्येत परत आले तेव्हा प्रजेने अतिक्षय आनंदाने त्यांचे स्वागत केले. अषा रामायणकाळात राजा–प्रजा यांचे संबंध अत्यंत सौहार्दपूर्ण असल्याचे दिसून येते. तसेच अत्यंत व्यावहारिक होते.

**7) प्रशासकीय व्यवस्थापन** – अयोध्येच्या प्रषासकीय व्यवस्थापनाची सभा, मंत्रीपरिषद, तीर्थ (अधिकारी किंवा विभागप्रमुख) अषी तीन अंगे दृष्टीस पडतात राजा हा शासनकर्ता किंवा प्रमुख व्यवस्थापक, सभेचा प्रधान होता. सभेचे सदस्य, सरकारी, निमसरकारी होते. सरकारी सदस्यात अमात्यगण (क्षत्रिय) मंत्रिगण (ब्राम्हण) सेनापती यांचा समावेष होतात. बिनसरकारी सदस्यामध्ये सामंत, पौर, जानपद

असत. शासनाच्या महत्वपूर्ण प्रष्नांवर या सभासदांचा विचार घेतला जात असे. सभेत उपस्थित राहण्यास दूतांकडून आमंत्रण दिल्या जाई. बाहेरून येणाऱ्या सदस्यांसाठी निवासस्थाने होते. सभाभवन हे राजप्रासादाचे महत्वपूर्ण अंग होते. राजाने सभसदांनी उच्च वस्त्राभरणे घालून सभेत बसावे असा दण्डक होता, सभेचे सर्व षिष्टाचार योग्य प्रमाणात पाळले जात.

**8) मंत्रीसंस्था** – मंत्रीसंस्था ही अमात्य संस्थेवर नियंत्रण ठेवणारी होती. यात वसिष्ठ वामदेव हे पुरोहित (ऋत्विज) आणि सुयज्ञ, जाबाली, काष्यम, गौतम, मार्कंडेय, कात्यायन असा आठ मंत्र्यांचा समावेष होता. यात वसिष्ठांचा अधिकार मोठा असून प्रत्येक महत्वाच्या प्रसंगी ते राजसत्तेला महत्वपूर्ण मार्गदर्षन देत असत. उदा. रामलक्ष्मणांना विष्वमित्रांकडे सोपविणे, लक्ष्मणाचा बलिदान प्रसंग, त्यांच्या अचूक मार्गदर्षनामुळे रामराज्य जगात आदर्षभूत ठरले.

**9) अमात्य संस्था** – दषरथ राजाच्या अमात्य संस्थेत आठ सदस्य होते. बालकाण्डाच्या 7 व्या सर्गात राज्यहिताला जपणाऱ्या राजाचे अंतरंग ओळखणाऱ्या आठ अमत्यांचा उल्लेख येतो. धृष्टि, जयंत, विजय, सुराष्ट्र, राष्ट्रवर्धन, अकोप, धर्मपाल आणि सुमन्त्र यापैकी सुमन्त्र हा राज्यषास्त्र पारंगत होता. हे सर्व अमात्य, असत्याचा द्वेष करणारे, ऐष्वर्यसंपन्न, आत्मसंयमी, शस्त्रास्त्रविद्याप्रविण, सत्यवादी, क्षमाषील, बुध्दीमान, राष्ट्रहितासाठी सदैव जागृत होते या अमात्य संस्थेनेच दषरथाच्या मृत्युनंतर रामाच्या वनवास गमनानंतर भरताच्या नेतृत्वाने अयोध्येचा राज्यकारभार यषस्वीपणे सांभाळला. राष्ट्रात शांतता राखण्याची जबाबदारी पाळून अमात्यांनी प्रजेला नीतिधर्माने वागायला लावले.

**10) तीर्थ (विभागप्रमुख किंवा उच्चाधिकारी)** – शासकीय कार्याच्या विभागप्रमुखांना तीर्थ असे म्हणत असत त्यांची संख्या 18 होती. या सर्व विभागप्रमुखांमध्ये न्यायाधीष हा उच्चाधिकारी समजला जात असे. राजा धर्मासनावर अत्यंत सत्याने, कायद्यानुसार पुरोहित ऋषी, मंत्री, व्यापारी यांच्या समवेत बसून न्याय करत असे वादी–प्रतिवादी

सरळ राजापर्यंत पोहचू शकत. सर्वोच्च न्यायालयाचा अध्यक्ष स्वतः राजाच होता. मन्त्रीसंस्था अंतीम निर्णयाच्या कार्यात राजाला मदत करीत.

परस्त्री अपहरण, बलात्कार, खोटी साक्ष, ठेवीचा दुरूपयोगी, वृध्दांची हत्या, आग लावणे, सैनिकांना वेतन न देणे, राजद्रोह हे घोर अपराध समजले जात असत. गुप्तचर व्यवस्था विषेष कार्यरत होती.

रामायणकालीन राज्यपध्दतीचा आलेख पुढीलप्रमाणे दर्षविता येतो–






**11) नगरव्यवस्था** – राजा किंवा युवराज नगरव्यवस्थेचा प्रमुख होता. नगर स्वच्छता, राजमार्गाची देखरेख, पाणीव्यवस्था, दिव्यांची व्यवस्था, दळणवळण नियंत्रण, नगराची सजावट, उद्यान व्यवस्था इत्यादि कार्ये पौरसमितीचा अध्यक्ष या नात्याने राजा प्रजेकडून करवून घेत असे.

**12) करव्यवस्था** – प्रजेने आपल्या उत्पन्नाचा सहावा भाग राजाला कररूपाने द्यावा आणि राजाने प्रजेचे प्रजेला पुत्रासमान मानून प्रेमाने तिचे रक्षण करावे याषिवाय धार्मिकयज्ञांचा 6 वा भाग, सामन्त राजांकडून प्राप्त झाले उपहार, रत्नांच्या खाणीतून मिळालेला भाग कररूपाने राजाला मिळत असे. श्रमिकवर्ग परिश्रमांच्या रूपाने राजाला कर देत असत. कर योग्य प्रमाणात द्यावा, प्रजाकल्याणासाठी कर प्राप्तीचा उपयोग करावा असे मत वाल्मीकींनी अनेक राजकीय विचार विनिमयातून व्यक्त केले आहे.

**13) परराष्ट्र संबंध व परराष्ट्र धोरण** – राजा दषरथाचे सार्वभौमत्व सर्व सामन्त राजांनी स्वीकारले होते. राजा दषरथ आणि राजा प्रभू रामचन्द्र या दोघांनी यषस्वीपणे अष्वमेध यज्ञ केले यावरून त्यांचे परराष्ट्रसंबंध सलोख्याचे होते हे स्पष्ट होते.

राजनीतित महत्वपूर्ण असलेल्या 1) संधी (सहकार्य, मैत्री), 2) विग्रह (षत्रुत्व) 3) यान (आक्रमणांची तयारी) 4) आसन 5) द्वैधोभाव (फूट पाडणे) 6) संश्रय (बलवान राजाचे साहय घेणे) हया षाड्गुण्य उपायांचे दर्षन रामायणात घडते.

रावणाषी युध्द करण्याच्या हेतूने राम सुग्रीवाषी मैत्री करतो (सन्धी), बालीषी शत्रुत्व करतो (विग्रह), वानरसैन्यासह रावणावर आक्रमणाची तयारी करून लंकेला प्रयाण करतो (यान, आसन), रावण–बिभीषणात फूट पाडतो (द्वैधीभाव) (सुग्रीव व विभीषणाच्या साहयाने रावणवध करतो) (संश्रय) शत्रुला जिंकण्यासाठी हे षाड्गुण्य सिध्दान्ताचे उपाय रामायणात आढळतात.

परराष्ट्रधोरणासंबंधी साम, दाम, दन्ड, भेद या चार उपायांचा अवलंब करणारा राजाच यषस्वी होतो अस युध्दकांडात म्हटले आहे (युध्दकाळ सर्ग 34), प्रसंगानुरूप राज्याची सप्तांगात्मक संकल्पनाही रामायणात आढळते.

1) स्वामी (राजा) 2) अमात्य (अयोध्याकाण्ड) 3) जनपद (राष्ट्र) 4) दुर्ग (किल्ला) (अयोध्या सुंदर काण्ड) (अयोध्यावर्णन, लंकावर्णन) 5) कोष (अयोध्याकाण्ड) (खजिना सुंदर कांड) 6) दंड (दूत संस्था,

सैन्यबल बालकांड, युध्दकाण्ड) 7) मित्र

ही यषस्वी राज्यकारभाराची आणि राज्यविस्ताराची सात अंगे अत्यंत प्रभावी असावीत हा आदर्ष परराष्ट्र धोरणाचा आदर्श विचार रामायणात आढळतो.

वानरांचे राज्य आणि लंकेचे राज्य स्वपराक्रमाने जिंकून रामाने राज्यविस्तार केला. तरी देखील या दोन्ही देषांषी रामाचा राजनैतिक व्यवहार हा नियंत्रणात्मक आणि निस्वार्थीपणाचा होता. रामाने किष्किन्ध ोच्या राज्यावर बालिवधानंतर सुग्रीवाला राजगादीवर बसविले आणि रावणवधानंतर विभीषणाला लंकेचे राज्य दिले. जिंकलेल्या राष्ट्राच्या अंतर्गत कारभारात लक्ष घालू नये, तेथील जीवनमूल्यांना धक्का न लावता तिचे नियंत्रण करावे या मानवतावादी परराष्ट्र धोरणाचा रामाने अवलंब केला. (किष्किधाकाण्ड सर्ग 6, युध्दकाण्ड) रावणवधानंतर राम म्हणतो, मरणान्तानि वैराणि शत्रुला मरण आले की वैर संपले. यातही रामाचे शत्रुत्व मानवतेला स्पर्ष करणारे आहे. रावणाचे संपूर्ण राज्य त्याचा लहान भाऊ बिभीषण याकडे सोपविले.

अषाप्रकारे उन्मत्त सत्तेचे दमन, प्रजेचे रक्षण आणि मानवतेचा आदर्ष ही आदर्ष राजनीतिची वैषिष्टये रामायणात आढळतात. ईक्ष्वाकु कुळाच्या साठ पिढयांची आदर्ष परंपरा रामाने कायम ठेवून आदर्ष राजनीतिची अविस्मरणीय देणगी या भारतभूमीला बहाल केली.

राजकीयदृष्टया प्रगत सिध्दान्ताच्या प्रवासातही राजकीय सिध दान्ताची भव्यता आदर्षाची पराकाष्ठा रामायणात पहावयास मिळते. रामकालीन राज्य हे सुयोग्य प्रजानुरंजक राज्य हाते. अयोध्येचा राज्यकारभार हा सत्य, अहिंसा, कठोर कर्तव्यनिष्ठा, आज्ञापालन आणि धर्म अर्थ काम मोक्ष या चतुर्विध पुरूषार्थाच्या जीवनमूल्यांषी संवाद साध णारा होता. राजा–मंत्री, अमात्य– राजदूत–प्रजा यांच्यात एकवाक्यता होती. या सर्व घटकांच्या संतुलित सहकार्यामुळे रामराज्य हे आदर्षराज्य मानले गेले. यावरूनच परवर्तीकाळातील राज्यकारभारांमध्ये उत्कृष्ट राज्यपध्दतीलाही 'रामराज्य' म्हणण्याची प्रथा पडली.



## रामायणाचे धार्मिक महत्व

महर्षी वाल्मीकीरचित रामायण हे हे भारतीय लोकजीवनाचे श्रध्देय अंग आहे. भारतीय जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात धर्माचा प्रभाव सर्वात मोठा आहे. रामायणकाळ हा भारतीयांच्या सांस्कृतिक वैभवाचा धार्मिक आणि आध्यात्मिक उत्कर्षाचा काळ होता. धार्मिक क्षेत्रात वैदिक धर्माला सर्वोच्च स्थान असुन रामायणातही वैदिक धर्माचेच प्रतिबिंब पडलेले दिसून येते.

## 1) वैदिक मंत्रोच्चारणासह धार्मिक कार्याचे अनुष्ठान

रामायणकालीन आर्य वैदिक कर्मकांडाचे निष्ठावन्त अनुयायी होते. आर्यांच्या प्रत्येक कर्माच्या अनुष्ठानात वैदिकमंत्राचा प्रयोग होत असे. मंगलकार्ये, गृहप्रवेष असो की नव्या पिकांचे आगमन असो, पुत्रांना देण्याचे आषीर्वाद असो की राज्याभिषेक असो. प्रत्येक कर्माच्या अनुष्ठानात वैदिकमंत्राचा प्रयोग होत असे.

दैनंदिन जीवनातील स्नान अर्ध्य, तर्पण, प्राणायाम, मन्त्रजप, देवतार्चन, होम, ही नित्यनैमित्तिक कार्ये आणि व्रतवैकल्ये, स्वस्तिवाचन, देवपूजा, नवरात्रीउत्सव, यज्ञ ही विषेष धार्मिक कार्ये वैदिक मंत्रोच्चारणांनीच होत असत.

एवढेच नव्हे तर दाहसंस्कार, श्राध्द तर्पण, पिंडदान इत्यादि पितृकार्येदेखील वैदिक मन्त्रोच्चारणांनी केले जात असत. रामायणकालीन या धार्मिक कार्याचा प्रभाव आजही भारतीयांच्या लोकजीवनावर पडलेला दिसून येतो. धार्मिक आचरणात देवपूजा, यज्ञ, स्वस्तिवाचन यांच्याबरोबरच तीर्थयात्रा, नदीपूजा, वृक्षपूजा, गोपूजा, नागपूजा यांना विषेष महत्वाचे स्थान होते.

## 2) धर्माची संकल्पना

रामायणात ‘धर्म’ हा शब्द कर्तव्यनिष्ठा, ईष्वराभिमुख आचार–विचार–उच्चार आणि नैतिक सदाचरण अषा व्यापक अर्थाने वापरलेला दिसून येतो. सदाचारी जीवनाला प्रेरक ठरणारे सत्य, अहिंसा, ध्यान, तपश्चर्या, स्वाध्याय, परोपकार, दान, आज्ञापालन, कर्तव्यनिष्ठा, सेवाभाव इत्यादि सर्व सद्‌गुणांचा समावेष धर्मामध्ये होतो.

धर्मात् अर्थः प्रभवति धर्मात् प्रभवते सुखम्
धर्मेण लभते सर्वं धर्मसारमिंद जगत्।

(अरण्यकाण्ड 9.30)

धर्माचरणाने अर्थप्राप्ति होते. धर्मामुळे सुख मिळते, धर्माचरणानेच सर्वकाही मिळते. धर्माचरण हेच जगाचे सार आहे असे रामायणात म्हटले आहे.

अयोध्याकाण्डाच्या 21 व्या सर्गात रामाने म्हटले आहे ''कर्तव्याचरण हे धर्माचे प्रधान साधन होय. कोणत्याही सुखाला किंवा आपत्तीला भुलून कर्तव्य टाळणे योग्य नव्हे. धर्माचा मार्ग क्लेषसाध्य आहे पण अंती सुखप्रद आहे.'' धर्माचरण हे मुख्यतः आध्यात्मिक उन्नतीचे साधन असले तरी ते शारीरिक व भौतिक कल्याणाला विरोधी नाही. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरूषार्थांपैकी पहिल्या धर्मामध्येच अर्थ काम मोक्ष हे तीन पुरूषार्थ सामावले आहेत. एका धर्मफलाची प्राप्ती झाल्यावर अर्थ, काम, मोक्ष या तिन्ही पुरूषार्थाची प्राप्ती आपोआप होते असे रामाचे मत आहे.

रामायणकालीन याच विचारांचा गंभीर प्रभाव पिढयान्पिढया भारतीय संस्कृतीवर झाला.

## 3) धर्माचे आदर्श आचरण

धर्म म्हणजे 'सदाचाराचे शास्त्र' हा अर्थ वाल्मिकींना अभिप्रेत होता. राम, भरत, लक्ष्मण, हनुमान, सीता, तारा, मन्दोदरी, विभीषण इत्यादि पात्रे कर्तव्यनिष्ठा, आज्ञापालन, एक पत्नीव्रत, विलक्षण बन्धुत्व, सेवाभाव, पातिव्रत्य त्याग, नम्रता, सहनषीलता इत्यादि सद्‌गुणांची मूर्तीमंत रूपे असल्याचे दिसून येते.

रामो विग्रहवान् धर्मः। राम म्हणजे धर्माचे साक्षात मूर्तीमंत रूप असे म्हटले आहे.

पुत्र, पति, बन्धु, राजा, पिता, शत्रु या सर्व भूमिकेतून रामाने निःस्वार्थपणे व धैर्याने धर्माषी सामना केला. आदर्षमूल्यांची जोपासना करण्यासाठी स्नेह, नातेगोते, ममता व साऱ्या सुखाचा त्याग करावा लागतो. हे सदाचाराचे शास्त्र रामाच्या जीवनातून दृष्टीस पडते. रामाच्या

अंगी असलेले आज्ञापालन, स्वार्थत्याग, सत्यवचनीपणा, अतुलनीय पराक्रम, कठोर धैर्य इत्यादि सारे बहुमोल सद्‌गुण रामाने प्रजाकल्याणासाठी खर्ची घातले. त्यामुळे रामाच्या व्यक्तिमत्वाला दैवी लोकप्रियता लाभली.

## 4) रामाचे ईश्वरत्व

जनसामान्यांच्या धार्मिक क्रियाकलापांमध्ये रामाच्या विष्णु अवताराचे रूप गृहित धरल्या गेले. रामाच्या उदात्त सद्‌गुणांमुळे रामाला सारभूत ईष्वरत्वाचे रूप देण्यात आले. रावणवधानंतर ब्रम्हादि देवदेवता आणि ऋषीमुनींनी रामाची जी स्तुती केली त्यात रामाला सुदर्षनधारी विष्णुचा अवतार मानले तर सीता ही साक्षात लक्ष्मीचे रूप मानल्या गेली. रामसीता यांना लाभलेल्या देवपणामुळे रामायण महाकाव्य पूजनीय ग्रन्थ बनला आणि देवघरात प्रतिष्ठित झाला.

## 5) आदर्श धार्मिक जीवन

सत्य, पराक्रम, प्रियवचन देवतांचे अतिथींचे पूजन, दान, तप, त्याग, व्रतनियम स्वाध्याय ही धार्मिक जीवनाची मुख्य लक्षणे आहेत. या जीवनमूल्यावरील निष्ठा कायम टिकविण्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याचा निर्धार करणे, प्रत्यक्षात त्या निर्धाराने वागणे हेच खरे धार्मिक जीवन होय असा आदर्ष रामायणाने जनसामान्यांना प्रदान केला. तो भाविकांनी साक्षात अनुभवला म्हणून स्वीकारला. भारतीयांचे जनजीवन रामचरित्राषी इतके समरस झाले की सहज भेट झाली असता रामरामजी, जय श्रीराम, जयरामजी की असे म्हणून बोलायला सुरूवात होते. एखाद्याच्या बळाचे मोजमाप करताना देखील 'यात काय राम आहे?' असे म्हणून ज्यात राम भरला आहे ती वस्तु श्रेष्ठ असा हिषोब केल्या जातो.

शोक व्यक्त करतानाही 'हाय राम', अरे राम म्हटल्या जाते मरतानाही 'हे राम' म्हणून मुक्ती मिळते. अषाप्रकारे जन्मापासुन मृत्युपर्यंत रामायणाची सर्व संस्कृती भारतीयांनी आत्मसात केली आहे. रामतत्व हे भारतीय जीवनात सदैव जागृत झाले. मनुष्याला शुध्द सात्विक निर्मळ आणि निर्भय बनवून जीवनात आनंद निर्माण करणे. मनुष्याला प्रेरित

करणे हाच धार्मिक जीवनाचा, धर्माचरणाचा मुख्य हेतू दिसून येतो. या धर्माचरणालाच 'स्वर्गाचा मार्ग' असे म्हटले आहे.

## 6) कर्मे ईश्वरार्पण करणे हा धर्माचरणाचा उद्‌देश

यज्ञ, दान, बलिहोम, स्नानसंध्या जप तप, अभिदेवतार्चन, वास्तुपूजा, वृक्षपूजा, व्रतवैकल्ये, उत्सव या सर्व धर्माचरणामागे दैनंदिन जीवनातील प्रत्येक कर्म ईष्वरार्पण करून परमार्थ साधणे, परमानंद मिळवणे हीच त्या मागची भावना होती.

इच्छित मनोकामनांच्या पूर्तीसाठी देवतांचे स्मरण स्तवन केल्या जात असे. प्रजाननांचे जीवन देवतांच्या अनुग्रहाने व्यापले होते. इन्द्र अग्नि सर्व देवता त्यांच्या सुख–दुःखात सहभागी आहेत अषी त्यांची भावना होती. यज्ञ, उत्सव आणि देवपूजेच्या प्रसंगी आसन, प्राणायाम, ध्यान, योग समाधी इत्यादि विषयांवर आणि अन्य व्रतांची चर्चा होत असे.

अषाप्रकारे रामायणात ईष्वराभिमुख विचार, श्रध्देचे पोषण करणारी उपासना, आपापसात प्रेम वाढवणारी वागणूक या सर्वांचा अन्तर्भाव 'धर्म' या शब्दात केला आहे. सदाचरण कर्तव्यनिष्ठा यांचाही अंतर्भाव धर्मातच होतो. उत्कृष्ट आदर्षाची परंपरा टिकवणे हे धर्माचरणाचे महत्वपूर्ण अंग आहे. अषी धर्माची व्यापक संकल्पना रामायणात आढळते म्हणून रामायण भारतीयांच्या जनमानसात पिढयान्‌पिढया लोकप्रिय ठरले, पूजनीय झाले.

## 7) नैतिक विचारांचा उच्चस्तर

परलोक विचार, गुरूजनांची आज्ञा पाळणे, इन्द्रिय संयम ठेवणे हे नैतिकतेचे सदाचरणाचे आधारस्तंभ समजले जात. उग्र तपष्चर्येतून आध्यात्मिक सफलता प्रदान करणे शक्य आहे. इन्द्रिय लोलुपांसाठी ती दुष्प्राप्य आहे. (3.5.28) अषा नैतिक विचारांचा उच्चस्तर रामायणात जागोजागी आढळतो म्हणून वैषिष्टयपूर्ण आहे.

## 8) आधुनिक काळात रामायणाचे धार्मिक महत्व



माघ, चैत्र, शुध्द, कार्तिक मासात पंचमीपासुन त्रयोदषीपर्यंत

रामायणाचे नऊ दिवस पाठ केल्या जातात. प्रत्येक काण्डाचे विषेष महत्व असुन स्वतंत्रपणे त्यांचे पाठ केल्या जातात. पुत्रकामनेसाठी बालकाण्ड, लक्ष्मीप्राप्तीसाठी अयोध्याकांण्ड, राज्याच्या प्राप्तीसाठी किष्किन्ध ाकाण्ड, सर्व कामनापूर्ती, ग्रहदोष निवारणासाठी सुन्दरकाण्ड, वीरपुत्राच्या प्राप्तीसाठी, शत्रुनाष होण्यासाठी युध्दकाण्डाचे विषेष पठन केल्या जाते.

आजही जीवनातील ताणतणाव दूर करण्यासाठी, मनःषांती मिळविण्यासाठी जीवनमूल्यें आत्मसात करणे, त्यांची जोपासना करून जीवन आनंदमय बनविण्यासाठी रामायणाचे धार्मिक अध्ययन करणे गरजेचे आहे.

## वाल्मीकी रामायणाचे सांस्कृतिक महत्व

वाल्मीकी रामायणाने भारतीय परंपरेला उच्च आणि आदर्ष संस्कृती बहाल केलेली दिसून येते. म्हणूनच रामायणाला विष्वव्यापक लोकप्रियता लाभली. तात्विक विचार, कर्तव्यनिष्ठा, आतिथ्यषीलता, अध यात्म, नैतिक जीवनमूल्ये, व्यवसाय, सुखसोयी वाढविणारी यन्त्रे या साऱ्यांचा संस्कृतीत समावेष होतो. आर्यसंस्कृतीचे प्राचीन युग रामायणाच्या रूपाने साकार झाले आहे. चिरंतनकाळापासून जीवनमूल्यांची जोपासना रामायणाद्वारे झाली

### 1) 16 संस्काराचे महत्व –

वाल्मीकी रामायणात जन्मापासुन मरणापर्यंत केल्या जाणाऱ्या कर्तव्यविषेषांचा म्हणजे संस्काराचा जागोजागी उल्लेख आढळतो. बालपणापासून मानवाला व्यक्तिमत्व विकास व सामाजिक विकास उत्तमरितीने व्हावा व सद्‌गुणांच्या विकासाबरोबरच ऐष्वर्यसंपन्नता लाभावी या दृष्टीने जातकर्म, उपनयन संस्कार, विवाह संस्कार महत्वपूर्ण मानले जात होते. धर्माचरण, भक्ति, विद्यार्जन, विवाह, थोरांची सेवा, सुसंघटित सामजंस्य चातुर्वण्य व्यवस्था यांच्या मुळाषी समाजाची एकता निहित होती. परस्परांविषयी आदराची भावना होती. यज्ञयाग, अर्ध्यतर्पण, प्राणायामादि आन्हिक, पुत्रेष्टि, राजसूय, अश्वमेध यज्ञ आणि अनेक संस्काराच्या मागे अषान्ति दूर करून सामाजिक बांधीलकी निर्माण

करणे, समाजात साहसी, उत्साही, आनंददायी वातावरण निर्माण करणे हे मुख्य उदि्दष्ट होते. नवस व्रतवैकल्ये यावर दृढविष्वास होता.

## 2) संगीत नृत्यकला

मनोरंजनाच्या विविध साधनांमध्ये संगीत आणि नृत्यकलांना विषेष प्राधान्य होते. संगीताच्या स्वर, वर्ण, ताल या तिन्ही स्वरूपांचे विविध वाद्यांचे वर्णन आढळते. 1.14.86 (2.76.18) उत्तरकांडात रामायणकांडाचे लवकुषांनी केलेल्या मधुर शास्त्रीय गायनाचा उल्लेख आढळतो. तसेच हनुमानाने रावणाच्या अन्तपूरात मन्द्र मध्य तार स्वरांनी विभूषित झालेली गीते ऐकल्याचा सुन्दरकाण्डात उल्लेख आहे. सुग्रीवाच्या राजभवनात लक्ष्मणाने संगीताची मधुर ताल ऐकली. अषाप्रकारे शास्त्रीयकलेच्या रूपात संगीताची प्रगती आढळते. राजसभेपासून सामान्य लोकांपर्यंत सर्वत्र नृत्य हे मनोरंजनाचे महत्वपूर्ण साधन होते. राज्याभिषेक, भरतागमन, रामसीतांचे अयोध्येत आगमन, यासारख्या शुभप्रसंगी सामुहिक नृत्ये होत. नाटयाभिमय करणारी नाटयमंडळे असुन नृत्य आणि लास्य हे तीन नृत्यप्रकार आढळतात. (2.6.14) याषिवाय घरे भिंती, दालने, रथ यांना षिल्पकलेने चित्रित करण्याची पध्दत असल्यामुळे षिल्पकला, चित्रकला विकसित स्वरूपात होत्या.

## 3) क्रीडाविनोद

रामायणकाळात अनेक सुखसोयी उपलब्ध होत्या, इन्द्रध्वज नामक सामाजिक उत्सव लोकप्रिय होता. राष्ट्रसंवर्धनाला पोषक अषा या उत्सवात सामुहिक भोजने होत होती. या प्रसंगी परंपरेने आलेल्या कथा सांगणे आणि ऐकणे हा मनोरंजनाचा सुलभ प्रकार होता. रामलक्ष्मणांना यज्ञप्रसंगी विष्वामित्रांनी अनेक ज्ञानवर्धक कथा सांगितल्या. तसेच राजकारणाची गंभीर चर्चा झाल्यानंतर थकलेल्या लोकांना विदूषक आपल्या चमत्कारीक बोलण्याने, वेषभूषेने हालचालींनी हसवून त्यांचे श्रम हलके करीत असत. मृगया ही राजेलोकांची विषेष क्रीडा होती. याषिवाय इतर विद्येतही अनेक लोक प्रवीण होते.

## 4) कूटागार –

स्त्रियांच्या मनोरंजनासाठी असलेल्या विषिष्ट स्थानाला कूटागार म्हणत असत. याषिवाय स्त्री–पुरूषांच्या मनोरंजनासाठी पानथाली, पुष्पग्रह, चित्रषाला, गृहोद्यान, विलासभवन ही स्थळे उल्लेखनीय होती. (1.5.15)

## 5) मन्त्रतन्त्रसिध्दी

मन्त्रतन्त्राचा वापर जनकल्याणासाठी होत होता. सुखसमृध्दिसाठी विविध देवताविषयक मन्त्राचा जप करून देवतांना प्रसन्न केल्या जात असे. प्रसन्न झालेल्या देवता साधकाला विषेष प्रकारच्या शक्ती प्रदान करीत. या शक्तीचा उपयोग जनकल्याणासाठी केल्या जाई. विष्वामित्रांनी रामलक्ष्मणाला बलातिबला शक्ति जनकल्याणासाठीच प्रदान केल्या.

## 6) शिक्षण –

बुध्दीला स्मरण, चिंतन, मनन करण्याची सवय लागावी म्हणून प्रामुख्याने मौखिक स्वरूपात षिक्षण दिले जात असे. विद्यादान श्रेष्ठदान समजले जाई. वेदविद्या, धनुर्विद्या, दण्डनीति इत्यादि विषयांसोबतच स्वच्छंदबलगामिनी, सर्वभूतविद्या, चक्षुश्मतीविद्या, कामरूपाधारिणी विद्या त्रिकालज्ञता विद्या, अष्टसिध्दी इत्यादि अनेक विद्येचे षिक्षण दिल्या जात असे. षिष्याच्या व्यक्तिमत्वांचा बौध्दिक, शारीरिक, मानसिक, बौध्दिक, व्यावहारिक, आध्यात्मिक विकास करणे असा सर्वागिण विकास करणे हे षिक्षणाचे प्रमुख ध्येय होते.

गुरूविषयी श्रध्दा बाळगणे, गुरू आज्ञेचे पालन करणे, षिस्त करून वागणे, संयम, अभ्यासाची जिद्द ठेवणे हे विद्यार्थ्याचे प्रथम कर्तव्य समजले जात होते. षिक्षणाबरोबरच शस्त्रविद्या, शस्त्रप्रयोग, गीत वाद्य अभिनय, युध्दविद्या इत्यादि विद्या षिकविल्या जात असत. शास्त्रज्ञांचे वादविवाद, विद्यापरिषदा यज्ञप्रसंगी होत असत. शास्त्रार्थ्याचे खंडनमंडनात्मक चिन्तन प्रवचने होत असत. विद्यार्थ्याला नित्य स्वाध्याय करणे आवष्यक होते. नवयुवक छात्र विद्यासंपन्न झाल्यावर त्याने

वादविवादात विजयी होण्याची ईच्छा बाळगावी, मुलीदेखील आश्रमात राहून विद्या षिकत, सीतेने मात्र जनकाच्या घरीच षिक्षणाची दीक्षा घेतली होती.

## 6) शास्त्रीय ज्ञानात प्रगती

समाजात संस्कृतभाषा लोकप्रिय होती. रामायणाच्या काळात विज्ञानाच्या अनेक शाखांमध्ये प्रगती झालेली दिसून येते. आयुर्वेद खगोलषास्त्र, जोतिष्यषास्त्रे, स्थापत्यकला, नगररचना, विषेष प्रगतीपथावर होते.

दिवसरात्र, महिने, वर्ष, पृथ्वीची परिक्रमा, अवकाशातील वायुंचे स्तर, सूर्य चन्द्र, भूगोल याविषयी सविस्तर ज्ञान होते. अयोध्येला 'वैद्यजनाकुल' असे म्हटले आहे. यावरून आयुर्वेदाची विषेष महत्व असल्याचे दिसते. शल्यचिकित्सा, रेखागणित, यांचे पर्याप्त ज्ञान प्राचलित होते. विराधनामक राक्षसाच्या मन्त्रतन्त्रज्ञानामुळे तो देवतांना अवध्य झाला होता.

## 7) स्वर्गनरक संकल्पना

इहलोक परलोकावर अगाध श्रध्दा होती. स्वर्ग नरक संकल्पना दृढ होती. पापकर्माने मनुष्य नरकात जातो. स्त्रियांना पतिव्रत्यामुळे स्वर्ग मिळतो. यज्ञानुष्ठानाद्वारे दक्षिणादान, प्रजापालनदक्षता, धर्मानुसार करवसुली, सेवकांचे पोषण इत्यादि कर्मे कर्तव्यदक्षतेने पार पाडून स्वर्गप्राप्ती होते. गुरूजनांची सेवा, मातापित्यांची सेवा करणाऱ्यांना कोणतेच सुख दुर्लभ नाही यावर आत्मविष्वास होता. स्वर्गनरकाविषयीच्या या विचारसरणीमुळे व्यक्ति सदैव स्वर्गप्राप्तीच्या इच्छेने सदाचाराकडे प्रवृत्त होत असत. दुराचारापासून दूर राहात असत.

## 8) पूर्वजन्मावर विश्वास

पूर्वजन्मी केलेल्या चांगल्या वाईट कर्माचे फळ मनुष्याला अवष्य मिळते यावर तत्कालीन समाजाचा दृढ विष्वास होता. रामाच्या वनवास गमनाच्या वेळी विलाप करताना दशरथ राजा म्हणतो, पूर्वजन्मी मी अनेक प्राण्यांची हिंसा केली असेल म्हणून आज हे विरहाचे भयंकर

संकट मला भोगावे लागले (2.12.29) वाली देखील सुग्रीवाषी केलेल्या शत्रुत्वाला पूर्वजन्मी केलेल्या पापाचे फळ मानतो.

## 9) आगामी जन्म

पापकर्मामुळे पुढच्या जन्मी षिक्षा होईल या भीतिने आपापल्या कार्याविषयी धार्मिक दृष्टीकोन ठेऊन काटेकोरपणे नीतिनियमांचे पालन करीत दैववादाचा स्वीकार करूनही कर्मवादाचे वारंवार समर्थन केले आहे.

## 10) त्यागधर्माला सर्वोच्च स्थान, आदर्श जीवनमूल्यांची शिकवण

परस्परांसाठी केलेल्या त्यागधर्माला रामाने जीवनाचा सर्वोत्तम आदर्ष मानले. व्यष्टि समष्टिचे हित त्यागभावनेत निहित आहे. या रामायणकालीन संस्कृतीचा आधार आध्यात्मिक असल्यामुळे आत्मकल्याण साधण्यासाठी, सत्य, अहिंसा, त्याग शान्ती समाधान हे आदर्ष आत्मसात केले पाहिजेत अषी ही संस्कृती गुणग्राहक आणि समाजवादी असल्याचे दिसून येते. जनसेवा हीच ईष्वरसेवा असा मानवतावादी दृष्टीकोन रामाच्या आचरणात दिसतो म्हणूनच रामाने अयोध्येचे राज्य भरतावर सोपविले. अरण्यावासीयांचे कल्याण केले. किष्किन्धेचे राज्य सुग्रीवाला दिले तर लंकेचे राज्य विभीषणाला दिले. सत्य अहिंसा, धैर्य क्षमा, अनासक्ति, इन्द्रियनिग्रह, निष्कपटता, त्याग, औदार्य, लोकसंग्रह विष्वबंधुत्व या सात्विक तत्वांनी युक्त असलेल्या भारतीय संस्कृतीचा सुन्दर मिलाप रामायणात आढळतो. ईष्वरनिष्ठांची मांदियाळी निर्माण व्हावी असे आदर्ष जीवनमूल्यांचे बीजारोपण रामायणात झालेले दिसून येते. म्हणूनच वाल्मीकी रामायण हे संस्कृतीचे व लोकषिक्षणाचे महत्वपूर्ण माध्यम समजले जाते. ईक्ष्वाकुकुळ, राजवंष, ऋषीमुनी या सर्वांच्या जीवनातून संस्कृतीचे सर्वांगीण चित्रण घडविले आहे. अनेक समस्यांना तोंड देण्यासाठी आवष्यक असलेली अस्मिता, स्वाभिमान, धैर्य, नीतिमत्ता, कर्तव्यनिष्ठा इत्यादि अनेक सद्‌गुणांची स्फूर्ती या वीरगाथेने समाजाला दिली. सामाजिक जीवनात उच्च जीवनमूल्यांना मिळालेले स्थिर स्थान म्हणजे उच्च संस्कृती. याचे साक्षात् दर्षन घडवून समाजाची सांस्कृतिक

पातळी उंचावण्याचा, संपूर्ण राष्ट्राला सत्पथावर राबविण्याचा प्रयत्न महर्षी वाल्मीकींनी रामायणाच्या या चित्तवेधक साहित्यकृतितून केलेला दिसून येतो.

## 11) आदर्श सभ्यता शिष्टाचार

याषिवाय रामायणकालीन संस्कृतीत आतिथ्यषीलता, गुरूजनांचा आदर व्यक्त करताना अभिवादन करणे, हस्तांदोलन करणे, आलिंगन देऊन सौहार्द प्रकट करणे, उपकारासाठी आभार प्रदर्षन करणे, इत्यादि रितीरिवाजांना विषेष महत्व होते. सामाजिक लोकपरंपरांना विषेष महत्व दिले जाई. आपल्या वचनाची सत्यता पटविताना शपथ घेणे, वाहनात चढण्यापूर्वी वाहनाची पूजा करणे, ज्योतिष्यानुसार मुहुर्त पाहून कार्यारंभ करणे, दैवावर विष्वास ठेवणे, शकुन अपषकुन मानणे, यांना विषेष महत्व होते.

## 12) वेषभूषा

लोक कुराचीर, मृगचर्म, वल्कले ही वस्त्रप्रावरणे परिधान करीत, रेषमी वस्त्र, काशायवस्त्रे, कंचूक पगडी, मुकुट, पायात पादुका धारण करीत, तिलक लावणे, कंठात सूवर्णकुंडले, कानात रत्नकुंडले, गळयात निष्क, माला, हार, ग्रैवेयक, हातात बाजुबंद, कडे, अंगठी, कंबरेवर मेखला, करधनी, पायात नुपुर, मस्तकावर चुडामणी, मुखवास, अंगराग, अळता काजल इत्यादि अलंकार व सौंदर्य प्रसाधने स्त्री–पुरूष वापरीत असत.

## 13) खाद्यपदार्थ

रामायणकाळ अन्नबहुल काळ होता. सामिष आणि निरामिष दोन खाद्यपदार्थ असत. लाडू खीर, फळांचे रस हे गोड पदार्थ असत. भोजनात गहू तूप, गहू तांदूळ, यव, मूग चणे, उडीद कुळीथ हे मुख्य पदार्थ असत.

एकंदरीत रामायणकालीन संस्कृतीत जनसामान्यांच्या

ऐष्वर्यसंपन्नतेबरोबर त्यांचा शारीरिक, मानसिक, बौध्दीक, सामाजिक

जीवनाचा विकास करणे हे राज्यकारभाराचे प्रजाकल्याणाचे प्रमुख उद्दिष्ट होते. आर्यसंस्कृतीची आदर्ष आधारषिला म्हणजे रामायण होय. रामराज्य म्हणजे सुखी संपन्न कर्तव्यनिष्ठ प्रेममय आनंदमय सुराज्याची संस्कृती होय.

***

प्रकरण 2 रे

# रामायणकालीन व्यवस्थापनाची तत्वे

विष्वातील समग्र प्राचीन भाषासाहित्यात संस्कृत भाषेचे स्थान सर्वश्रेष्ठ आणि विष्वव्यापक असून त्यातील बौध्दिक ठेवा हा जगातील आद्य ज्ञानकोष समजला जातो. जागतिकीकरणाच्या युगात अनेक भाषांचा ऱ्हास होत असला तरी संस्कृत भाषेचे अस्तित्व आजही टिकून आहे. 'या प्रथमा संस्कृती विष्ववारा' असे यजुर्वेदात (7.4) म्हटलेले आढळते. महर्षी व्यासांनी 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' असे सांगुन ज्ञानविज्ञानाचे प्रत्येक अंग संस्कृत भाषेत असल्याचे सूचित केले आहे.

जगातील या सर्वात प्राचीन भारतीय संस्कृतीने संस्कृत साहित्याच्या माध्यमातून विष्वाला आयुर्वेद गणित, ज्योतिष, व्याकरण, भौतिक, तत्वज्ञान, राज्यषास्त्र, अर्थषास्त्र, पर्यावरणादि अनेकानेक वैज्ञानिकषास्त्रांच्या आणि मानव्यषास्त्राच्या मूलभूत व सूक्ष्मातिसूक्ष्म सिध्दान्तांचे योगदान दिलेले आढळते. आजच्या 21 व्या शतकातही अग्रगण्य समजल्या जाणाऱ्या व्यवस्थापन षास्त्राचे सूत्रबद्ध सिद्धान्त प्रतिपादन करतानाही संस्कृत भाषा डौलाने मिरवताना दिसते हेही भूषणास्पद आहे.

संस्कृत साहित्यातील वैदिक साहित्य, रामायण, महाभारत, कामन्दकीय नीती, शुक्रनीति दर्षन इत्यादि अनेकानेक ग्रंथसाहित्यात व्यवस्थापनषास्त्राचे अनेक उल्लेख आढळतात. व्यवस्थापनषास्त्र अधिकृतपणे सुरू होण्यापूर्वी प्राचीन भारतीय संस्कृत साहित्यात व्यवस्थापनाच्या तत्वांचे विकसित स्वरूप कसे प्रचलित होते हे प्रतिपादन करण्यास वाल्मिकी रामायण ग्रंथाचा आधार घेऊन व्यवस्थापन शास्त्रातील तत्वांची व मानव संसाधन व्यवस्थापनाच्या विविध घटकांच्या तत्वांची प्रत्यक्ष अंमलबजावणी कषी होत होती याचा शोध घेऊन त्याची सामाजिक उपयोगिता प्रस्तुत शोध निबंधाच्या आधारे सिध्द करण्याचे ठरविले आहे.

## व्यवस्थापन शब्दाचा अर्थ आणि व्याख्या

ऋग्वेद (131.11), (1.151.8), (1.39.4), पाणिनी तंत्रवाद, न्यायकुसमात्रजली (27.8), विष्णुस्मृति (3.3), चतुवर्गचिन्तामणि (26.4) कौटिल्य अर्थषास्त्र (प्रथम अधिकरण) इत्यादि ग्रंथांमध्ये व्यवस्थापन शब्दाचा उल्लेख आढळतो.

सृष्टीच्या प्रत्येक रचनेत व्यवस्थापन दृष्टीस पडते. नक्षत्र, नद्या, पर्वते, वृक्षपाने, फळे, जीवजन्तू, मानवी देहाची रचना या प्रत्येक रचनेत व्यवस्थापन आहे. ऋत म्हणजे सत्य, नीतिपरायणता, सुव्यवस्था संपूर्ण विष्व हे 'ऋत' या निसर्गाच्या सुव्यवस्थेवर आधारलेले आहे.

''सृष्टीके आधारभूत सिध्दान्त'' को 'ऋत' या नीतिपरायणता कहा गया है। 'ऋत' संपूर्ण विष्व में व्याप्त है, वैदिक दृष्टीकोन के अनुसार ऋत यह विष्व की नैतिक व्याख्या है। (नीतिषास्त्र की रूपरेखा, अषोककुमार वर्मा, पटना विष्वविद्यालय मोतिलाल बनारसीदास), यावरून संपूर्ण विष्व हे व्यवस्थापनाच्या तत्वावर अधिष्ठित असल्याचे दृष्टीस पडते.

वि + अव् + स्थापय् इति व्यवस्थापयति अषी व्यवस्थापन शब्दाची व्युत्पप्ती असून याचा अर्थ व्यवस्था लावणे, व्यवस्था करणे असा होतो.

1) संस्कृत साहित्यात घटयति, स्थापयति, शासन, नियंत्रण, अवेक्षण, उपाय, व्यवहार, स्थापना, समुत्थानं, स्थापनं, चिन्तय, यांत्रिक्, व्यवस्थापन, अध्यक्षता, संविधा इत्यादि शब्दांमधून व्यवस्थापन प्रक्रियेतील विविध संकल्पनाचा समावेष असल्याचे आढळते.

2) 'भेदविषयस्य व्यवस्थापनं व्यवस्था च युज्यते अषी वेगवेगळया घटकांची कारणमीमांसा करून त्यांचा मेळ साधणे, वर्गीकरण करून व्यवस्था लावणे, पुनर्योजना करणे, पुनर्स्थापना करणे, इत्यादि अनेक शब्दार्थ आजच्या व्यवस्थापनाच्या व्याख्येषी जुळणारे आहेत.

वैदिक साहित्य, रामायण, कौ. अर्थषास्त्र या भारतीय साहित्यात प्रतिबिंबित झालेल्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक, साहित्यिक कार्यसंस्कृतीपासून व्यवस्थापनषास्त्रातील महत्वपूर्ण संकल्पना दृगोच्चर

झालेल्या आढळतात.

## वाल्मिकी रामायणातील व्यवस्थापनाची तत्वे

वाल्मिकी रामायण हे भारतीय संस्कृतीचा अपूर्व ज्ञानकोष असून जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रातील कार्याची आदर्ष तत्वे प्रतिपादन करणारे महाकाव्य ऐतिहासिक आहे. राजकारण असो की समाजकारण, साहित्य असो की निसर्ग व्यवहार मानव्यषास्त्राच्या ज्या–ज्या दृष्टीकोनातून आपण रामायणाचा अभ्यास करू त्या–त्या शास्त्राची मूलभूत तत्वे रामायणात आढळतात. चोवीस हजार लोकांचे सप्तकाण्डात्मक असे हे आदिकाव्य भारतीय लोकजीवनाचे अविभाज्य असे श्रध्देय अक्षर वाङ्मय आहे. अक्षर वाङ्मयाची कसोटी ही की ते स्थळ काळावर मात करून चिरंतन रहाते व आदर्ष लोकजीवन घडविण्यास समर्थ असते.

वाल्मीकी रामायणाच्या अयोध्या कांडातील 67व्या सर्गात 'नाराजके जनपदे' या पालुपदातून राज्यात अराजकता पसरली तर कसे अनर्थ घडतात हे सांगताना व्यवस्थापनाची आवष्यकता प्रतिपादन केली आहे.

ज्या जनपदात कोणी राजा नसतो तेथील शेतीत मुठभर बोजेही विखुरली जात नाही. म्हणजेच विविध कल्याणकारी योजनांचे नियोजन केले जात नाही. मंदीरे, धर्मषाळा बांधले जात नाही. लोकांचा योगक्षेम चालत नाही, राष्ट्राचे हितकारी संघ निर्माण होऊन राहत नाही. (अयोध्याकांड सर्ग 67)

वाल्मिकी रामायणाच्या अरण्य काण्डातील 100 व्या सर्गात राम–भरत भेटीच्या प्रसंगात रामाने भरताला राजनीतिविषयक उपदेष करताना यषस्वी व्यवस्थापनाची पुढील सुत्रे सांगितलेली आढळतात.

मन्त्रो विजयमूलं हि राज्ञां भवति राघवः।
सुसंवृत्तो मन्त्रिधुरैरमात्यैः शास्त्रकोविदः।।

वा. रा. अरण्यकाड सर्ग 180



राज्याची सुयन्त्रणा म्हणजेच सुव्यवस्थापन हे यषाचे मूळ कारण असते. नीतिषास्त्रनिपुण मन्त्री अमात्यांनी व्यवस्थापनेतील महत्वपूर्ण

यंत्रणा गुप्त ठेवली तरच व्यवस्थापनेचे कार्य यषस्वी होते.

काच्य मुख्या महत्वे व मध्यमेषु च मध्यमाः।
जघन्याश्च जघन्येषु भृत्यास्ते ता योजिताः।।

अरण्यकांड सत्र 180

कर्मचारी व्यवस्थापन उत्तम मध्यम कनिष्ठ अषा तीन स्तरावर असावे. 'श्रेष्ठान् श्रेष्ठेषु कच्चित् त्वं नियोजयसि कर्मसु।' श्रेष्ठ व्यक्तिंना श्रेष्ठ कार्यात नियुक्त करावे.

याषिवाय घेतलेले निर्णय चटकन् अमलात आणावे, ज्या कार्यसिध्दीची साधने कर्म आणि फळ मोठे असेल अषी कार्ये निष्चित करून ती तत्काळ अमलात आणावी

(सर्ग 100 लोक 26 ते 31)

अषी आजच्या व्यवस्थापनातील महत्वपूर्ण सूत्रे रामायणकाळातही प्रचलित होती.

## अधिकारी व कर्मचारी नियुक्ती

अरण्यकाण्डाच्या 100 व्या सर्गात अधिकारी व कर्मचारी नियुक्ती करताना कोणकोणते गुणधर्म लक्षात घ्यावे हे सांगितले आहे.

शेतीची उन्नती करणे, व्यापार वाढविणे, दुर्ग बनविणे, पुल बांधणे, जंगली हत्तीचा सदुपयोग करणे अषा पध्दतीने केलेले व्यवस्थापन व्यवस्थापकाला आयुष्यवर्धक यषवर्धक व पुरूषार्थांची प्राप्ती करून देणारे ठरते. खाणींवर अधिकार प्राप्त करणे, कर वसुली करणे, निर्जन प्रदेषांना समृध्द करणे हे राष्ट्राच्या प्रगतीचे आठ मार्ग प्रयत्नपूर्वक आत्मसात करावे. सामदाम भेद दण्ड या चार नीतिचा यथायोग्य वापर करून कार्याचे नियोजन करावे अरण्यकाण्ड सर्ग 100 लोक 64 ते 70.

आपल्या कार्यचमूला निष्चित ध्येयाकडे नेण्याचे कठीण कार्य करणाऱ्या नेत्याला, व्यवस्थापकाला व्यसनांच्या आहारी न जाता संघटनेच्या कार्यात गुंतवून ठेवले पाहिजे, नीतिन्यायाचे रक्षण करून तरूणांचे

चांगले गुण ओळखून योग्य कार्यात नियुक्ती करणे हे संघटन कौषल्याचे सूक्ष्म मार्गदर्षन केलेले असून चांगली माणसे निवडून त्यांना कार्यप्रवृत्त

करणे हेच व्यवस्थापनाचे खरे सूत्र रामाच्या वक्तव्यात आढळते.

प्रषासकीय व्यवस्थापनाच्या सुयोग संचालनासाठी प्रत्येक राज्यात एक विकसित क्रियाषील प्रषासन व्यवस्था असावी हे सुदृष्ठ राज्यव्यवस्थेचे लक्षण रामायण काळातही मानल्या गेले. दषरथ राजा हा प्रमुख प्रषासक असून त्याचे मन्त्रीमंडळ आठ सदस्यांनी युक्त होते, प्रषासन व्यवस्थेच्या सुयोग्य संचालनासाठी केन्द्रीय समिती, मंत्री परिषदेची स्थापना केली गेली. वैदिक राष्ट्रीय समितीचे प्रतिबिंब रामायणात मंत्री परिषदेच्या स्वरूपात आढळते. (अयोध्याकांड सर्ग 6, 7, 8)

राजाची नेत्याची निवड करणे, राज्याभिषेक करणे व राजनैतिक महत्वपूर्ण निर्णय घेताना मंत्री परिषदेची सभा आयोजित करून निर्णय घेतल्या जात असे. ही मंत्री परिषद परम्परागत आदर्ष विचारांचा आश्रय घेऊन आपल्या अधिकाराचा वापर करीत असे. त्यात कुठेही स्वेच्छावृत्ती आढळत नाही. कोणत्याही कार्यारंभी मंत्री परिषदेचा आश्रय घेताना आढळतात. (अयोध्याकाण्ड सर्ग 2 ते 43)

14 वर्षे वनवास पत्करून रामाने अयोध्येचे राज्य भरतावर सोपविले. भरतानेही चौदा वर्षानी ते वापस देण्याचे आष्वासन दिले. भरतानेही चौदा वर्षे प्रामाणिकपणे राज्य करून रामावर सोपविताना म्हटले, ‘‘हे रामा, तुझ्या पादुका राजगादीवर ठेऊन मी या पृथ्वीचे राज्य सांभाळले ते आज मी तुझ्यावर सोपवित आहे. या अयोध्येच्या राज्यातील कोष, कोषागार, शस्त्रागार, सैन्यबळ सर्वांचे निरीक्षण केल्यास त्यात तुला दहापट वाढ झालेली दिसेल.’’ (युध्दकाण्ड सर्ग 127 लोक 55—56)

अषाप्रकारे रामायणकालीन प्रषासकीय व्यवस्थापनात अत्यंत प्रामाणिकपणा, पारदर्षीपणा व सत्यता आढळते. दुसऱ्यांवर राज्य सोपवितांना कोषागार रिकामा करून नव्हे तर त्यात दहापट वाढ करून तो सोपविण्यात यावा हा आदर्ष व्यवस्थापनाचा रामायणाने दिलेला विचार आजच्या व्यवस्थापनाला निष्चितच अनुकरणीय आहे. आपल्या विचारांच्या कक्षा वाढवून कर्तृत्वाला उदात्त करणे, संघटन कौषल्याने मानवी संबंध टिकवणे, कार्यक्षमता वाढवणे हेच खरे नेतृत्व हे भरताच्या आणि श्रीरामाच्या उत्कृष्ठ व्यवस्थापन कौषल्यातून दृष्टीस पडते.

वाल्मीकी रामायणाच्या किष्किन्धाकाण्ड, सुन्दरकाण्ड, युध्दकाण्डामधून व्यवस्थापनाच्या नियोजन, संघटन, सकारात्मक दृष्टिकोन, समयपालन, ताणतणाव व्यवस्थापन, कार्यप्रेरणा, प्रयत्नवाद, सुसंवाद, कर्मचारी व्यवस्थापन मनुष्यबळ व्यवस्थापन यांचे आदर्ष चित्रण आजच्या व्यवस्थापनालाही उपयुक्त ठरणारे आहे.

**1) नियोजन –**

कार्यसिध्दीसाठी नियोजन करताना सन्धी विग्रह यान आसन द्वैधीभाव, संश्रय या सहा युक्तींचा वापर करावा (अरण्यंकाण्ड) सकारात्मक दृष्टी आणि धैर्य ठेवावे. प्रत्यक्ष कार्य करताना कर्मचाऱ्यांवर अतिप्रेम न दाखवता मध्यमस्थितीवर दृष्टी ठेवून कार्य करावे. नियोजनाचे रक्षण केले तरच कार्य यषस्वी होतात. नियोजन कार्यात त्रुटी होणार नाही अषा विवेकी लोकांनाच नियुक्त करावे. (सर्ग 56, 34 कि.काण्ड)

समयपालन करून कार्य केले नाही तर, यष मिळण्यात अडथळा येतो (सुंदरकांड 1.1)

**2) संघटन –**

सीतेच्या शोधाचे अवघड कार्य करण्यासाठी सुग्रीवाने हनुमान, जाम्बवन्त, अंगदादि महायोध्दांना साहसी वीरांना मदतीला घेतले. वानर सैन्याची प्रबळ संघटना तयार केली. (कि.का. 40, 26–34) सीतेच्या शोधा कुठंपर्यंत घ्यावा हे सांगण्यासाठी पूर्व–पष्चिम, उत्तर–दक्षिण चारही दिषांच्या अंतीम टोकापर्यंत सैन्याला जाण्यास सांगितले. यावरून संघटकाला आपल्या उद्दिष्टांची अंमलबजावणी करताना आपल्या कार्याचा विस्तार– मर्यादा कुठपर्यंत आहे याची किती सविस्तर माहिती असावी लागते याचा प्रत्यय येतो. प्रचण्ड मनुष्यबळ असूनही त्यांना कार्याची योग्य दिषा देऊन कार्याला प्रवृत्त करणे, त्यांच्याकडून काम करवून घेणे हे संघटनचातुर्य असणे हेच खरे व्यवस्थापन होय. अन्यथा कर्मचारी विघातक स्वरूपाची कार्ये करू शकतात. सीतेच्या शोधासाठी उत्कृष्ट यंत्रणा निर्माण करणारा सुग्रीव षिस्तबध्द संघटकाच्या व कार्याचे सखोल ज्ञान असणाऱ्या उपव्यवस्थापकाच्या रूपात दृष्टीस पडतो.

### 3) कार्यप्रेरणा

उत्साह, सामर्थ्य, मनाची हिम्मत न हारणे हे कार्यसिध्दीचे प्रमुख गुणधर्म कार्य प्रेरणेत महत्वाचे ठरतात. कार्य करताना आळस करू नये. वेळ घालवू नये, हा महत्वाचा संदेष सुग्रीवाने वानर सैन्याला दिला, (कि कांड सर्ग 43.5–6, सर्ग 45, 5–6)

### 4) प्रयत्नवाद

वानरसैन्याने सुग्रीवाला सांगितले प्रयत्नांची षिकस्त करून आम्ही सीतेचा शोध घेऊ, सर्ग 45, 10–16 कि.काण्ड) वानरसैन्याचा हा प्रयत्नवाद कार्यसिध्दीचे गमक आहे. कर्मचारी आपल्या क्षमतेचा जास्तीत जास्त वापर कसा करतात यावर संघटनेची यषष्विता अवलंबून आहे. वानरसैन्यासारख्या धडपडणाऱ्या माणसांचे व्यक्तिमत्व अधिक विकसित करणे, त्यांच्या सामर्थ्यांना चालना देण्यास साहय करणे हाच खरा मानव संसाधनाचा विकास होय हा विचार रामायणकाळातही किती दृढमूल झाला होता हे उल्लेखनीय आहे.

### 5) सुसंवाद

संघटनेच्या सांघिक कार्यात सर्वांचे सहकार्य मिळविण्यास सुसंवाद साधणे गरजेचे असते. सुसंवादातून मने जोडल्या जातात. अषक्य शक्य करता येते हे सम्पाती अंगद जाम्बवान यांच्या संवादातून लक्षात येते. (सर्ग 59. 26, 27, 28) कि.काण्ड

### 6) दृढनिश्चय

सीतेचा शोध घेऊनच रामाकडे परतायचे हा हनुमानाचा दृढनिष्चय होता. सीतेचा शोध लागला नाही तर राम लक्ष्मणबरोबरच मी आणि सुग्रीवाचे राज्यही नष्ट होईल. सीताही प्राणत्याग करेल असा विचार त्यांच्या मनात येतो. (21.25–30 सुंदर काण्ड) यावरून ठरविलेल्या उद्‌दिष्टांची प्राप्ती झाली नाही तर काय काय अनर्थ घडू शकतात, कोणकोणत्या समस्या निर्माण होऊ शकतात याचे सूक्ष्म विचारसामर्थ्य कल्पना सामर्थ्य अधिकाऱ्यांना असावे, उद्‌दिष्टपूर्ती झाली तर कोणते सकारात्मक परिणाम घडतील याचाही सखोल विचार कर्मचाऱ्यांना करता आला पाहिजे.

अषाप्रकारे उच्च, मध्यम, कनिष्ठ पातळीवरील व्यवस्थापन प्रकार रामायणात दृष्टीस पडतात कार्यपध्दती, नियंत्रण, कर्मचारी, नियंत्रण, पर्यवेक्षण असे नियंत्रण प्रकारही दृष्टीस पडतात. सीताषोधाचे प्रत्यक्ष कार्य कितपत पूर्ण होत आहे याचा अंदाज घेऊन विषेष उपाययोजना करण्यास हनुमान यषस्वी झाला. त्यामुळे कार्याला गती मिळाली. अषाप्रकारे नियोजन, संघटन, संचालन, समन्वय, प्रतिपूर्ती ही व्यवस्थापनाची सर्व तत्वे अत्यंत प्रामाणिकपणा, प्रखर प्रयत्नवाद, सत्यतेवर आधारलेली असल्याचे रामायणात दृष्टीस पडतात.

अषाप्रकारे रामायणकाळी व्यवस्थापनाची प्रत्यक्ष अंमलबजावणी कषी होत होती याचे दर्षन घडते ते आजही प्रत्यक्ष अंमलात आणले तर व्यवस्थापनाच्या क्षेत्रातील विकासाचे महत्वपूर्ण पाऊल ठरेल असा आत्मविष्वास वाटतो.

**संदर्भग्रंथ** –

1) श्रीमद् वाल्मीकी रामायणम् – गीता प्रेस, गोरखपूर
2) व्यवस्थापनाची मूलतत्वे – मोहन सराफ, रमेष दापके, नागपूर
3) मानवी संसाधनाचे व्यवस्थापन – डॉ. सुधीर बोधनकर, डॉ. विवेक अलोणी, नागपूर

***